




उजवीकडे वळण घेण्यास बंदी आहे.



डाव्या बाजूकडील उलट-सुलट वळण



पुढे आडवा रस्ता आहे.



सुरक्षित लोहमार्ग ओलांडण्याचा मार्ग (ठिकाण)



गतिरोधक पुढे आहे.



पुढे शाळा आहे.



एकेरी मार्ग,
येणाऱ्या वाहनास मनाई आहे.



हॉर्न वाजवू नये



सायकलींना मनाई

*ही जागा खाजगी मालकीची आहे*
*हा रस्ता रहदारीचा नाही*

वरील चिन्हांचे वाचन करून घ्यावे. त्यांचे अर्थ समजावून सांगावेत. रहदारीच्या नियमांची माहिती द्यावी. (३.३.१)

शिक्षण खात्याचा मंजुरी क्रमांक : पापुमं/१०९७/१४७७८/३ री भाषा/मराठी/स-पुस्तक दि. ९.१.९८







# मराठी

# बालभारती

## इयत्ता तिसरी

नाव ____________________

शाळा ____________________

इयत्ता __________ तुकडी __________



महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

| | | |
|---|---|---|
| प्रथमावृत्ती : १९९८<br>सुधारित आवृत्ती : २०००<br>सातवे पुनर्मुद्रण : २००७ | | © महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे - ४११००४.<br>या पुस्तकाचे सर्व हक्क महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळाकडे राहतील. या पुस्तकातील कोणताही भाग, संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ यांच्या लेखी परवानगीशिवाय उद्धृत करता येणार नाही. |
| मराठी भाषा समिती | : | प्राचार्य राम शेवाळकर, अध्यक्ष<br>श्री. व. द. देसाई, सदस्य<br>श्री. ह. गं. नारलावार, सदस्य<br>श्रीमती रेणू दांडेकर, सदस्य<br>श्रीमती वर्षा सहस्रबुद्धे, सदस्य<br>श्रीमती शीला गुर्जरपाध्ये, निमंत्रित सदस्य<br>श्री. माधव राजगुरू, सदस्य-सचिव |
| संयोजन प्रमुख<br>सहायक | : | माधव राजगुरू, विशेषाधिकारी, मराठी विभाग<br>श्रीमती उषादेवी देशमुख, विषय सहायक, मराठी |
| चित्रकार | : | श्री. आनंद मांडे |
| मुखपृष्ठ | : | श्री. चारुहास पंडित |
| अक्षरजुळणी | : | संगणक विभाग, पाठ्यपुस्तक मंडळ,<br>'बालभारती', सेनापती बापट मार्ग, पुणे - ४११ ००४. |
| निर्मिती | : | श्री. प्रमोद शिरोडकर, मुख्य निर्मिती अधिकारी<br>श्री. संजय कांबळे, निर्मिती अधिकारी |
| कागद | : | ७० जी.एस.एम. क्रीम वोव्ह |
| मुद्रणादेश | : | N/TECH/2007- 08 [1.00] |
| मुद्रक | : | THE NADAR PRESS LTD., SIVAKASI. |
| प्रकाशक | : | डॉ. वसंत काळपांडे. नियंत्रक,<br>पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ,<br>प्रभादेवी, मुंबई - ४०००२५. |

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे. सारे भारतीय माझे बांधव आहेत. माझ्या देशावर माझे प्रेम आहे. माझ्या देशातल्या समृद्ध आणि विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे. त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन. मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन. माझा देश आणि माझे देशबांधव यांच्याशी निष्ठा राखण्याची मी प्रतिज्ञा करीत आहे. त्यांचे कल्याण आणि त्यांची समृद्धी ह्यांतच माझे सौख्य सामावले आहे.

## प्रस्तावना

'क्षमताधिष्ठित प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम-१९९५' नुसार पाठ्यपुस्तक मंडळाने मराठी बालभारती, इयत्ता तिसरी हे पाठ्यपुस्तक १९९८ साली प्रकाशित केले. 'सरस-२००१' या प्रकल्पांतर्गत तिसरीच्या पुस्तकाची सुधारित आवृत्ती आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद वाटतो.

तिसरीचे पाठ्यपुस्तक जास्तीत जास्त निर्दोष व दर्जेदार व्हावे, या दृष्टीने महाराष्ट्राच्या सर्व भागांतील प्राथमिक शिक्षक आणि विषयतज्ज्ञ यांच्याकडून या पुस्तकाचे **प्रकाशनपूर्व** समीक्षण करण्यात आले होते. पुस्तक आहे, त्यापेक्षा अधिक निर्दोष, अधिक दर्जेदार आणि अधिक प्रभावी होण्यासाठी पाठ्यपुस्तक मंडळाने **प्रकाशनोत्तर** समीक्षणाचा ***'सरस-२००१'*** हा संशोधन प्रकल्प हातीं घेतला. या प्रकल्पात पुढील चार मार्गांनी पुस्तकाचे समीक्षण करण्यात आले :-

१. महाराष्ट्रातील निवडक शाळांकडून चाचणीद्वारे वर्षभर प्रत्याभरण घेणे;
२. विषयतज्ज्ञांकडून परीक्षण करून घेणे;
३. संस्था व व्यक्ती पातळीवर संशोधन प्रकल्प घेणे; आणि
४. शिक्षक, पालक यांच्याकडून आलेली पत्रे, वृत्तपत्रांतून छापून आलेली टीकात्मक परीक्षणे यांतील सूचनांचा विचार करणे.

सन १९९८-९९ या शैक्षणिक वर्षात वरील चारही मार्गांनी आलेल्या सूचना व अभिप्रायांचा विचार करून मराठी समितीने या पुस्तकाची सुधारित आवृत्ती या वर्षी तयार केली आहे.

शिक्षकांचे अध्यापन नेमके आणि अधिक प्रभावी व्हावे, म्हणून पाठांवरील प्रत्येक स्वाध्यायास क्षमता क्रमांक आणि आवश्यक तिथे शिक्षकांसाठी सूचना दिलेल्या आहेत.

शिक्षकांप्रमाणेच पालकही विद्यार्थ्यांच्या स्वयंअध्ययनात मदत करू शकतील असे या पुस्तकाचे स्वरूप ठेवले आहे. मराठी समिती व चित्रकार यांच्या आस्थापूर्वक परिश्रमातून हे पुस्तक तयार झाले आहे. मराठी समितीचे आणि पाठ्यपुस्तक लेखनामध्ये ज्या शिक्षकांचे, तज्ज्ञांचे सहकार्य लाभले, त्या सर्वांचे मंडळ मनःपूर्वक आभारी आहे.

पालक, शिक्षक आणि विद्यार्थी यांच्या दृष्टीने अधिक उपयुक्त अशा या सुधारित आवृत्तीचे सर्वांकडून स्वागत होईल, अशी आशा आहे.

पुणे
दिनांक : १ जानेवारी, २०००
११ पौष, शके १९२१

(एन. के. राठोड)
**संचालक**
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व
अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

## क्षमताधिष्ठित अभ्यासक्रम आणि पाठ्यपुस्तके

गेल्या चाळीस-पन्नास वर्षांत शिक्षणाचा प्रसार खूप झाला; पण गुणवत्तेबाबत शाळा-शाळांमध्ये, प्रांता-प्रांतांमध्ये फरक पडला. गुणवत्तेबाबत उद्‌भवलेल्या या प्रश्नावर क्षमताधिष्ठित अध्ययन-अध्यापन हा एक उपाय आहे. प्राथमिक शिक्षण घेणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याला काय यायला हवे, याचा विचार म्हणजेच अध्ययन क्षमतांचा विचार. यात प्रत्येक विद्यार्थ्याने जास्तीत जास्त क्षमता प्राप्त केल्या पाहिजेत, अशी अपेक्षा आहे. विद्यार्थ्याच्या वर्तनात अपेक्षित बदल दिसून आला, तर त्याने संबंधित विशिष्ट क्षमता प्राप्त केली असे म्हणता येईल; मात्र हा बदल टिकाऊ स्वरूपाचा असला पाहिजे. हे टिकाऊ स्वरूपाचे बदल घडवूनच प्राथमिक शिक्षणात गुणात्मक सुधारणा करता येईल.

अभ्यासक्रमाच्या (क्षमताधिष्ठित प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम-१९९५) विविध क्षेत्रांमध्ये क्षमतांच्या विकसनाचे जे टप्पे दर्शवलेले आहेत ते परस्परावलंबी आहेत. त्यांतील संबंध लक्षात घेऊन पाठ्यपुस्तकाची रचना करण्यात आलेली आहे; म्हणूनच प्रत्यक्ष अध्यापनाच्या वेळी पाठ्यपुस्तकातील क्रम तोच ठेवायचा आहे.

क्षमताधिष्ठित अध्यापन हा काही अध्यापनातील पूर्णतया नवीन प्रयोग किंवा नवीन सिद्‌धान्त नाही; परंतु आता अभ्यासक्रमात नमूद केलेल्या क्षमता, वर्गातील प्रत्येक विद्यार्थ्याला प्रभुत्व पातळीवर प्राप्त झाल्या पाहिजेत, यासाठी प्रयत्न करायचे आहेत. अपेक्षित कृती विद्यार्थ्याला अचूकतेने, सहजतेने आणि योग्य त्या गतीने करता आली, म्हणजे त्याने संबंधित क्षमतेची प्रभुत्व पातळी गाठली असे म्हणता येईल. पाठ्यपुस्तकाचा वापर क्षमतेवरील प्रभुत्वासाठी करायचा आहे. त्यासाठी पाठ्यपुस्तकातील सामग्रीबरोबरच शिक्षकाने स्वतः तयार केलेले साहित्यही वापरणे अपेक्षित आहे.

शिक्षकांचा हेतू केवळ पाठ्यपुस्तक संपवणे असा असता कामा नये. वर्गातील सर्व विद्यार्थ्यांना विशिष्ट क्षमता प्राप्त करून देणे हा हेतू असावा. जरूर तेथे अध्यापनाचा वेग कमी-जास्त करून तसेच उजळणी, नवीन उपक्रम, विविध स्वाध्याय इत्यादींचा वापर करून तो साध्य करायचा आहे.

वर्गातील सर्व विद्यार्थी विशिष्ट क्षमतेकडे बरोबरीने जावेत, यासाठी पाठ्यपुस्तकात अनेक प्रकारचे स्वाध्याय, उपक्रम आणि कृती दिलेल्या आहेत. त्या कशा घ्यायच्या याच्या सूचनाही दिलेल्या आहेत. विद्यार्थी क्षमता संपादनाच्या कोणत्या टप्प्यावर आहेत आणि संपादन केलेली क्षमता टिकून आहे की नाही, याचे मूल्यमापन सातत्याने करायचे आहे. एखादी क्षमता प्राप्त झाली नाही किंवा टिकून राहिली नाही असे आढळल्यास उपचारात्मक उपक्रमांची सोय केली पाहिजे. पाठ्यपुस्तकात नमुना चाचणी प्रश्न दिले आहेत. त्या प्रश्नांचा तसेच त्या धर्तीवर तयार केलेल्या जास्तीच्या प्रश्नांचा शिक्षकांनी वापर करावा. क्षमताधिष्ठित अध्यापनाचा आणखी एक विशेष म्हणजे प्राप्त झालेल्या क्षमतेचा वापर विद्यार्थ्यांना बाह्य जगात करता येणे. मूल्यमापनात या उपयोजनाचाही समावेश शिक्षकाने केला पाहिजे.

विद्यार्थ्याला होणारी क्षमतेची प्राप्ती वैयक्तिक आहे; मात्र त्याने ती संपादन करण्याची प्रक्रिया सांघिक आहे. त्या स्वरूपाच्या अध्यापनातून गुणवत्तेमध्ये समानता येणे आणि अध्ययनात सांघिक भावना वाढणे असा दुहेरी फायदा होईल अशी अपेक्षा आहे.

## क्षमतांची यादी
## (१९९५ च्या अभ्यासक्रमातून)

| क्षेत्र | क्षमता क्र. | क्षमता |
|---|---|---|
| श्रवण | १.३.१ | कथन, वर्णन, कविता आणि समूहगीते समजपूर्वक ऐकता येणे. |
| | १.३.२ | अपरिचित प्रसंगातील संभाषण आणि संवाद समजपूर्वक ऐकता येणे. |
| | १.३.३ | खेळ आणि साधी कृती यांसंबंधी दिलेल्या तोंडी सूचना समजपूर्वक ऐकता येणे. |
| भाषण | २.३.१ | योग्य उच्चार करून बोलता येणे. |
| | २.३.२ | योग्य अभिनय आणि आवाजात योग्य चढउतार करून सोप्या, परिचित गोष्टी सांगता येणे, तसेच गाणी, कविता म्हणता येणे. |
| | २.३.३ | परिचित वस्तूंचे व पदार्थांचे वर्णन करता येणे. |
| | २.३.४ | गुंतागुंतीचे, कठीण व विचारप्रवर्तक प्रश्न विचारता येणे. |
| वाचन | ३.३.१ | परिसरातील आणि रस्त्यावरील खुणा, पाट्या तसेच सूचनाफलकावर लावलेल्या सूचना समजपूर्वक वाचता येणे. |
| | ३.३.२ | मुलांच्या हस्ताक्षरातील मजकूर समजपूर्वक वाचता येणे. |
| | ३.३.३ | सोप्या व लहान गोष्टींची मुलांसाठी लिहिलेली पुस्तके समजपूर्वक वाचता येणे. |
| लेखन | ४.३.१ | वळणदार अक्षरे काढणे, दोन अक्षरांत व दोन शब्दांमध्ये योग्य अंतर ठेवून अनुलेखन करता येणे. |
| | ४.३.२ | अपरिचित शब्दांचे व वाक्यांचे श्रुतलेखन करता येणे. |
| | ४.३.३ | सोपे, मार्गदर्शित, निबंधात्मक लेखन करता येणे. |
| आकलन (ऐकून व वाचून) | ५.३.१ | ऐकलेल्या किंवा वाचलेल्या मजकुरातील मुख्य विचार/कल्पना सांगता येणे. |
| | ५.३.२ | पाठ्यभाग वाचून किंवा ऐकून असे का घडते ? यांसारख्या प्रश्नांची उत्तरे देता येणे. |
| कार्यात्मक व्याकरण | ६.३.१ | शब्दांतील अर्थसंबंध ओळखता येणे. |
| स्वयंअध्ययन | ७.३.१ | चित्र-शब्दसंग्रहाचा स्वयंअध्ययनासाठी उपयोग करता येणे. |
| भाषेचा व्यवहारात उपयोग | ८.३.१ | गटात आपली पाळी येईल तेव्हाच बोलणे. |
| शब्दसंपत्तीवर प्रभुत्व | ९.३.१ | सुमारे ३००० शब्दांचे आकलन होणे. |

(१९९५ च्या अभ्यासक्रमातून)

**कोणत्या अध्ययन क्षमतेसाठी कोणते अध्ययन अनुभव/उपक्रम घ्याल ? खालील तक्त्यात पाहा. याचा वर्षभर उपयोग करा.**

| अध्ययन क्षमता क्रमांक | अध्ययन अनुभव / उपक्रम |
|---|---|
| १.३.१ | १. परिसरातील स्थळांची माहिती गोळा करून विद्यार्थ्यांना सांगणे.<br>२. समाजातील विविध व्यवसायांतील व्यक्तींच्या कामाची माहिती देणे.<br>३. वाढदिवस, विवाहप्रसंग, समारंभ, सहल, प्रवास इत्यादींचे वर्णन ऐकवणे.<br>४. साहस कथा, बाल कथा, चातुर्य कथा, विनोदी कथा, विज्ञान कथा ऐकवणे.<br>५. पाठ्यपुस्तकातील व पाठ्येतर उतारे व नाट्य उतारे ऐकवणे.<br>६. कविता व समूहगीते ऐकवणे. |
| १.३.२ | १. विद्यार्थ्यांना विविध ठिकाणी नेऊन तेथे चालणारे संभाषण ऐकण्याची संधी उपलब्ध करून देणे.<br>२. शालेय समारंभ व अन्य कार्यक्रमांत संवाद ऐकण्याची संधी देणे.<br>३. आकाशवाणी, दूरदर्शनवरील मुलांसाठी असणाऱ्या कार्यक्रमांमधील संवाद ऐकवणे. |
| १.३.३ | १. वेगवेगळ्या प्रकारचे खेळ आयोजित करणे.<br>२. शालेय दिन व विशेष प्रसंगी करायच्या कृतीसंबंधी दिलेल्या सूचना ऐकवून पालन करणे. |
| २.३.१ | १. शब्दपट्ट्या व वाक्यपट्ट्या यांचे वाचन करवून घेणे.<br>२. गद्य व पद्य पाठांतर स्पर्धा आयोजित करणे.<br>३. उच्चार करण्यास कठीण असलेल्या व्यंजनांच्या व जोडाक्षरांच्या उच्चारांचा सराव घेणे.<br>४. उच्चारभेद असणाऱ्या अक्षरयुक्त शब्दांचे तक्ते तयार करणे व योग्य उच्चारांचा सराव घेणे.<br>५. टेपरेकॉर्डरचा उपयोग करून चुकीचे उच्चार सुधारणे. |
| २.३.२ | १. ऐकवलेल्या कथा व कवितांचे साभिनय कथन व गायन करवून घेणे.<br>२. कथाकथन, काव्यगायन, अभिनययुक्त नाट्यीकरण आयोजित करणे.<br>३. दैनंदिन व्यवहारांतील प्रसंगांचे सादरीकरण करवून घेणे. |

| अध्ययन क्षमता क्रमांक | अध्ययन अनुभव / उपक्रम |
| --- | --- |
| २.३.३ | १. परिचित वस्तू, पदार्थ दाखवून त्यांची नावे विचारणे व वर्णन करवून घेणे.<br>२. परिचित वस्तूंची चित्रे दाखवून विद्यार्थ्यांना त्यांचे वर्णन करावयास सांगणे. |
| २.३.४ | १. मुलांना विविध प्रसंग, साहित्य, स्थळे इत्यादींची चित्रे दाखवून त्यांवर प्रश्न विचारण्यास उद्युक्त करणे.<br>२. वर्गामध्ये गट पाडून त्यांची प्रश्नोत्तर स्पर्धा घेणे.<br>३. विषय देऊन प्रश्न विचारण्यास उत्तेजन देणे. |
| ३.३.१ | १. विद्यार्थ्यांच्या परिसरातील सार्वजनिक ठिकाणे, दुकाने इत्यादी ठिकाणी लिहिलेले नामफलक/सूचना वाचून येण्यास सांगणे व काय वाचले हे वर्गात विचारणे.<br>२. वर्तमानपत्रांतील मथळे वाचून घेणे. |
| ३.३.२ | १. मुलांनी स्वतःच्या हस्ताक्षरांत लिहिलेल्या गोष्टी, वर्णने/पत्रे वाचण्यासाठी शोकेसमध्ये प्रदर्शित करणे किंवा फळ्यावर लिहिणे.<br>२. निरनिराळ्या मुलांच्या हस्ताक्षरांतील मजकूर मुलांकडून वाचून घेणे. (उदा. गोष्टी, वर्णने, सूचना इत्यादी) |
| ३.३.३ | १. पाठ्यपुस्तके व वर्ग वाचनालयातील पुस्तके वाचावयास देणे.<br>२. वृत्तपत्र-कात्रणांचा संग्रह करून वाचण्यास देणे.<br>३. योग्य गतीने अनुवाचन व मूकवाचन करवून घेणे.<br>४. वाचनस्पर्धा घेणे. |
| ४.३.१ | १. सुलेखन व अनुलेखन करून घेणे.<br>२. हस्ताक्षर प्रदर्शन आयोजित करणे. |
| ४.३.२ | १. अपरिचित शब्दांचे श्रुतलेखन करवून घेणे.<br>२. अपरिचित शब्द असलेल्या वाक्यांचे श्रुतलेखन करवून घेणे.<br>३. लेखनदोष दूर करण्यासाठी मार्गदर्शन करणे.<br>४. नेहमी चुकीचे लिहिले जाणारे शब्द निवडून त्या शब्दांचे तक्ते वर्गात लावून त्यांचे श्रुतलेखन व अनुलेखन घेणे. |

| अध्ययन क्षमता क्रमांक | अध्ययन अनुभव / उपक्रम |
|---|---|
| ४.३.३ | १. चित्र/चित्रमालिकेच्या आधारे प्रश्न विचारून निबंधात्मक लेखन करवून घेणे.<br>२. मुद्दे देऊन त्यांच्या साहाय्याने निबंधात्मक लेखन करवून घेणे.<br>३. सोप्या विषयांवर चर्चा करून निबंधात्मक लेखन करवून घेणे.<br>४. परिसरातील वस्तू, घटना इत्यादींचे निरीक्षण करण्यास प्रोत्साहन देऊन ५-६ वाक्ये लिहून घेणे.<br>५. सोपे विषय देऊन स्वतंत्र निबंधात्मक लेखन करवून घेणे. |
| ५.३.१ | १. पाठ्यपुस्तक व वर्गवाचनालयातील पुस्तकांमधील निवडक उताऱ्यांचा संग्रह करणे.<br>२. निवडक उताऱ्यांचे वाचन करवून घेणे व त्यातील मुख्य कल्पनांवर आधारित प्रश्नांची उत्तरे घेणे.<br>३. ऐकलेली/वाचलेली गोष्ट स्वतःच्या शब्दांत ऐकवण्यास सांगणे व सारांश विचारून घेणे. |
| ५.३.२ | १. पाठ्यपुस्तकातील मजकुराचे वाचन व श्रवण करवून घेणे व त्यावर आधारित प्रश्न विचारणे.<br>२. दूरदर्शन, आकाशवाणी आणि टेपरेकॉर्डर यांवरील निवडक कार्यक्रम ऐकवणे. त्यांतील कार्यकारणभावावर आधारित प्रश्न विचारणे. |
| ६.३.१ | १. संवर्गानुसार शब्दसूची तयार करणे.<br>२. शब्दपट्ट्या तयार करून अर्थसंबंध स्पष्ट करणाऱ्या जोड्या जुळवून घेणे. |
| ७.३.१ | १. शब्द-चित्र-संग्रह तयार करून घेणे. |
| ८.३.१ | १. शिष्टाचार पालन करून बोलता यावे यासाठी गटचर्चा आयोजित करणे. |
| ९.३.१ | १. अवांतर वाचन करवून घेणे.<br>२. भाषिक खेळ, शब्दकोडी इत्यादींचा वापर करणे.<br>३. शब्दसंपत्तीत भर पडेल अशा प्रकारचा मजकूर ऐकवणे. |

## अनुक्रमणिका

## गाणे १. जय भारता



जय भारता, जय भारता, जय भारती जनदेवता ।।धृ.।।

जय लोकनायक थोर ते ।
जय क्रांतिकारक वीर ते ।
जय भक्त ते रणधीर ते ।
जय आमुची स्वाधीनता ।
जय भारता जय भारता ।। १ ।।

१.३.१, २.३.२

तेजोनिधी हे भास्करा ।
प्रिय पर्वता, प्रिय सागरा ।
तरुवृक्ष हो हे अंबरा ।
परते पहा परतंत्रता ।
जय भारता जय भारता ॥ २ ॥

बलिदान जे रणि जाहले ।
यज्ञात जे धन अर्पिले ।
शतकांत जे हृदयी फुले ।
उदयाचली हो सांगता ।
जय भारता जय भारता ॥ ३ ॥

ध्वजनील मंडळ हो उभा ।
गतकाल हा वितरी प्रभा ।
भवितव्य हे उजळी नभा ।
दलितांस दाविल तारता ।
जय भारता जय भारता ॥ ४ ॥

कवी - कुसुमाग्रज

गाणे क्र. १, २,, ३ आणि ४ चालीवर म्हणून दाखवावे. योग्य अभिनय आणि योग्य चढउतारांसह स्वतंत्रपणे आणि समूहात मुलांकडून म्हणवून घ्यावे.

## गाणे २. या बालांनो, या रे या !



या बालांनो, या रे या !
लवकर भरभर सारे या !
मजा करा रे ! मजा मजा
आज दिवस तुमचा समजा.
स्वस्थ बसे
तोचि फसे;
नवभूमी !
दाविन मी,
या नगराला लागुनिया
सुंदर ती दुसरी दुनिया.
या बालांनो ! या रे या !
लवकर भरभर सारे या !

खळखळ मंजुळ गाति झरे,
गीत मधुर चहुबाजु भरे.
जिकडे तिकडे फुले फळे,
सुवास पसरे, रसहि गळे.
पर ज्यांचे
सोन्याचे,
ते रावे
हेरावे

१.३.१, २.३.२

तर मग कामे टाकुनिया
नवी बघा या ही दुनिया !
या बालांनो, या रे या !
लवकर भरभर सारे या !



पंख पाचुचे मोरांना,
टिपति पाखरे मोत्यांना,
पंख फडकती घोड्यांना,
मौज दिसे ही थोड्यांना.

चपलगती
हरिण किती !
देखावे
देखावे.

तर मग लवकर धावुनिया
नवी बघाया ही दुनिया !
या बालांनो, या रे या !
लवकर भरभर सारे या !

कवी - भा. रा. तांबे

# गाणे ३. झाडे लावू



एक झाड लावू मित्रा
त्याला पाणी घालू
मोठे झाल्यावर, त्याच्या
सावलीत खेळू.



एक झाड लावू मित्रा
त्याला कुंपण करू
मोठे झाल्यावर, फुले
ओंजळीत भरू.

एक झाड लावू मित्रा
त्याची निगा राखू
मोठे झाल्यावर, त्याची
गोड फळे चाखू.





एक झाड लावू मित्रा
त्याला रोज पाहू
त्याची गाणी गाता गाता
मोठे मोठे होऊ.

कवी - अनंत भावे

१.३.१, २.३.२

# गाणे ४. छोटेसे बहीणभाऊ



छोटेसे बहीणभाऊ
उद्याला मोठाले होऊ
उद्याच्या जगाला, उद्याच्या युगाला
नवीन आकार देऊ

ओसाड उजाड जागा
होतील सुंदर बागा
शेतांना, मळ्यांना, फुलांना, फळांना
नवीन बहार देऊ

मोकळ्या आभाळी जाऊ
मोकळ्या गळ्याने गाऊ
निर्मळ मनाने, आनंदभराने
आनंद देऊ अन् घेऊ

प्रेमाने एकत्र राहू
नवीन जीवन पाहू
अनेक देशांचे, भाषांचे, वेशांचे
अनेक एकच होऊ



कवी - वसंत बापट

१.३.१, २.३.२

# १. जिकडे तिकडे पाणीच पाणी

जिकडे तिकडे पाणीच पाणी, खळखळणारे झरे ।
झुळझुळणारे गवत पोपटी, लवलवणारे तुरे ।
नवी लकाकी झाडांवरती
सुखात पाने-फुले नाहती
पाऊसवारा झेलित जाती भिरभिरती पाखरे
जिकडे तिकडे पाणीच पाणी, खळखळणारे झरे ।
हासत भिजती निळसर डोंगर
उड्या त्यांतुनी घेती निर्झर
कडेकपारी रानोरानी नाद नाचरा भरे
जिकडे तिकडे पाणीच पाणी, खळखळणारे झरे ।
मधेच घेता वारा उसळी
जरी ढगांची तुटे साखळी
हिरव्या रानी ऊन बागडे हरिणापरि गोजिरे
जिकडे तिकडे पाणीच पाणी, खळखळणारे झरे ।

कवी - शंकर वैद्य



१.३.१, २.३.२, ३.३.३, ४.३.१, ४.३.३, ५.३.१, ५.३.२, ६.३.१, ९.३.१

तुरे - गवताचे शेंडे
लकाकी - चमक
नाहणे - पावसाने भिजून जाणे, अंघोळ करणे
निर्झर - झरा
बागडणे - आनंदाने नाचणे

स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे सांगा.** (५.३.१, ५.३.२)
  (१) झाडांवर नवी लकाकी केव्हा येते ?
  (२) पाऊसवारा झेलत कोण जातात ?
  (३) डोंगरावरून उड्या घेत कोण जातात ?
  (४) हरिणासारखे कोण बागडते ?
- **कवितेतील जोडशब्द शोधा आणि लिहा.** (६.३.१, ९.३.१)
  **जसे** - खळखळ
  ........................................................................
- **जोड्या जुळवा.** (६.३.१)
  (अ) झुळझुळणारे लवलवणारे भिरभिरती खळखळणारे
  (ब) पाखरे झरे गवत तुरे
- **कवितेच्या ओळी पूर्ण करा.** (५.३.२)
  हासत भिजती .................. डोंगर
  उड्या त्यांतुनी घेती ..................
  कडेकपारी रानोरानी नाद .................. भरे
- **ही कविता सामूहिकरीत्या म्हणा.** (२.३.२)

**पावसाळ्याच्या दिवसांत उघडीप पडली असताना मुलांना परिसरात किंवा बागेत फिरवून आणावे व त्यांना, पाहिलेल्या दृश्यांचे वर्णन पाच-सहा वाक्यांत लिहिण्यास सांगावे.** (४.३.३)

- **खालील शब्द काळजीपूर्वक पाहा. वाचा. लिहा.** (४.३.१, ९.३.१)
  पाऊस, ऊन, लकाकी, गोजिरे, निर्झर.



# २. सवय शिस्तीची

शाळेचा पहिला दिवस होता. घंटा झाली. मुले मैदानावर येऊन आपापल्या वर्गाच्या रांगेत उभी राहिली. आम्ही शिक्षकही रांगेत पुढे उभे राहिलो. 'सावधान' अशी आज्ञा झाली आणि राष्ट्रगीत सुरू झाले. माझ्या वर्गातील काही मुले चुळबूळ करत होती. राष्ट्रगीत म्हणताना शिस्तीत स्तब्ध उभे राहण्याचे महत्त्व त्यांना अजून समजलेले नसावे.

राष्ट्रगीत म्हटल्यावर मुले आपापल्या वर्गात जाऊन बसली. पहिल्याच दिवशी मुलांना न रागवता शिस्तीचे महत्त्व कसे पटवून द्यावे, याचाच मी विचार करत होतो. मी वर्गात गेल्यावर मुले शांत झाली. एक-दोन धीट मुलांनी 'गुरुजी, गोष्ट सांगा' असे म्हटले. मी म्हणालो, ''तुमच्यापैकी कोणी गोष्ट सांगणार असेल, तर त्यानं सांगावी. मी आनंदानं ती गोष्ट ऐकेन.''

सदू उभा राहिला आणि गोष्ट सांगू लागला.



१.३.१, २.३.२, २.३.४, ३.३.३, ४.३.१, ५.३.१, ५.३.२, ६.३.१, ८.३.१, ९.३.१

एक लहानसं गाव होतं. तिथं एक सुभेदार राहत होते. त्यांनी सैन्यात बरीच वर्षं नोकरी केली आणि आता घरदार सांभाळावं, शेतीभाती करावी म्हणून ते गावी राहायला आले होते.

एकदा सुभेदार नेहमीप्रमाणे हंडा घेऊन पाणी आणायला नदीवर गेले. सुभेदारांनी हंडा पाण्यानं भरून घेतला आणि तो डोक्यावर घेऊन ते घराकडं यायला निघाले.

सुभेदारांनी दोन्ही हात डोक्यावरील हंड्याभोवती गच्च धरले होते. कसलातरी विचार करत ते चालले होते.

रस्त्याला लागूनच शाळेचं मैदान होतं. मैदानावर मुलं कवायतीसाठी रांगेत उभी होती. शिक्षक मुलांना काही सूचना देत होते. सूचना देऊन झाल्यावर शिक्षकांनी आज्ञा दिली 'सावधान !'

'सावधान !' हा शब्द सुभेदारांच्या कानांवर पडला. त्यांचे पाय चटकन जुळले गेले; डोक्यावरच्या हंड्यावरील हात आपोआपच झटकन सुटले आणि सुभेदार 'सावधान' स्थितीत उभे राहिले. डोक्यावरील हंडा दणदिशी खाली पडला. त्यासरशी सुभेदार भानावर आले. मनातल्या मनात म्हणाले, 'अरे ही काही सैन्यातील कवायत नाही !'



सुभेदारांच्या डोक्यावरील हंडा खाली पडल्यावर मोठा आवाज झाला. शिक्षक आणि मैदानावरील सर्व मुले सुभेदारांकडे धावत गेली.

शेजारच्या पारावर बसलेला एक माणूस तरातरा पुढे आला. नेमकं काय घडलं याची कल्पना नसल्यामुळे तो म्हणाला, ''मुलं थोडी खट्याळच आहेत, कुणाचीपण थट्टामस्करी करतात. चला रे पोरांनो, निघा इथून.''

सुभेदार मात्र शांत होते. सावकाश त्यांनी हंडा उचलला आणि त्या माणसाला म्हणाले,

''गड्या, तू नको मनावर घेऊस. मुलांनी काहीही केलं नाही. पाणी सांडलं, पुन्हा आणता येईल; यातून झाडांना पाणी घातल्याचं सत्कर्मच घडलं. त्यामुळे मला आनंदच झाला आहे. अरे, आयुष्यभर मी सैन्यात नोकरी केली. ती शिस्त, ती सवय माझ्या अंगी पूर्ण भिनली आहे, याची पावतीच आज मला मिळाली आहे. जे मी मिळवलं ते अजूनही मनामध्ये पूर्ण भिनलंय, याचा मला अभिमानच वाटतो.''

वर्ग एकदम शांत झाला. गोष्ट सांगणारा मुलगा खाली बसला. त्याने सांगितलेल्या गोष्टीचा आधार घेऊन मी म्हणालो,

''मुलांनो, ऐकलंत; किती छान गोष्ट सांगितली सदूनं ! सुभेदारांसारखी शिस्त शाळेतल्या प्रत्येक मुलाच्या अंगी यायला पाहिजे. सुभेदाराचा हंडा खाली पडून त्याचं नुकसान झालं असेल, पण त्यांच्यातल्या शिस्तीचं आणि राष्ट्राभिमानाचं मोल त्याहून मोठं आहे. शिस्त अशी अंगवळणी पडावी, की ती सर्वच कामांत, सर्वच प्रसंगी दिसावी. राष्ट्रगीत म्हणताना तर ती दिसायलाच हवी. आपल्या देशाचं राष्ट्रगीत केव्हाही, कुठंही सुरू झाल्याबरोबर आपण असू तिथे 'सावधान' स्थितीत स्तब्ध राहिलंच पाहिजे; राष्ट्रगीताचा मान आपण राखलाच पाहिजे !''

लेखक - बा. तु. कुलकर्णी

**स्तब्ध** - न हालता, न बोलता, स्थिर **सुभेदार** - सैन्यातला एक अधिकारी
**खट्याळ** - खोडकर

प्रत्येक पाठाच्या पहिल्या पृष्ठाच्या तळाशी चौकटीत पाठात व स्वाध्यायात येणाऱ्या क्षमतांचे क्रमांक दिले आहेत. प्रत्येक पाठावरील प्रत्येक स्वाध्यायाला त्यात येणाऱ्या क्षमतेचा क्रमांक दिला आहे.

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे लिहा.** (५.३.१, ५.३.२)

  (१) राष्ट्रगीत चालू असताना काही मुले चुळबूळ का करत होती ?
  (२) सुभेदार गावी राहायला का आले होते ?
  (३) सुभेदारांच्या डोक्यावरील हंडा खाली का पडला ?
  (४) सुभेदारांस कोणत्या गोष्टीचा आनंद झाला ?
  (५) राष्ट्रगीताचा मान आपण कसा राखावा ?

- **कोण, कोणास म्हणाले ते सांगा.** (५.३.१)

  (१) "मुलं थोडी खट्याळच आहेत, कुणाचीपण थट्टामस्करी करतात !"
  (२) "जे मी मिळवलं ते अजूनही मनामध्ये पूर्ण भिनलंय, याचा मला अभिमानच वाटतो."

- **कंसातील शब्दसमूहांचे योग्य रूप रिकाम्या जागी लिहा.** (६.३.१)

  (१) नियमित व्यायाम करण्याचे मुलांनी .............. (मनावर घेणे) (२) सर्वांनी राष्ट्रध्वजाचा .................... (मान राखणे) (३) राष्ट्रगीताच्या वेळी स्तब्ध उभे राहण्याची शिस्त मुलांच्या .................................. (अंगवळणी पडणे)

- **सुभेदार तुमच्या वर्गात आले, तर तुम्ही त्यांना कोणते प्रश्न विचाराल ? तीन प्रश्न सांगा.** (२.३.४, ८.३.१)

- **खालील शब्द काळजीपूर्वक पाहा. वाचा. लिहा.** (४.३.१, ९.३.१)

  राष्ट्रगीत, गोष्ट, स्तब्ध, गच्च, शिस्त.



## ३. निश्चयाचे बळ



१५ ऑगस्ट, १९४७ रोजी आपला देश स्वतंत्र झाला. देशाला स्वातंत्र्य मिळवून देण्यासाठी महात्मा गांधीजींनी आयुष्यभर प्रयत्न केले. मोहनदास करमचंद गांधी हे त्यांचे पूर्ण नाव. सगळेजण त्यांना प्रेमाने बापू म्हणत. हेच गांधीजी पुढे खूप मोठे झाले. लोक त्यांना 'महात्मा' म्हणू लागले.

हे कसे घडले ? हे घडले गांधीजींच्या अंगी असलेल्या गुणांमुळे. त्या अनेक गुणांपैकी एक महत्त्वाचा गुण म्हणजे त्यांचा दृढनिश्चय. एकदा मनात निश्चय केला, एखादी गोष्ट करायची ठरवली, की ते त्यापासून माघार घेत नसत. एका लहानशा गोष्टीवरून त्यांच्या निश्चयी स्वभावाची ओळख होते.

१.३.१, ३.३.३, ४.३.१, ५.३.१, ५.३.२, ६.३.१, ९.३.१

एकदा गांधीजींनी ठरवले, की आपण काही श्लोक पाठ करावेत. रोज एक श्लोक पाठ करायचा, असा त्यांनी निश्चय केला. पाठ करायचा श्लोक ते एका कागदावर लिहून काढत. नंतर तो कागद, ते भिंतीवर चिकटवून ठेवत. काम करताना, येता-जाता तो श्लोक ते पाठ करत. असे एक नाही, दोन नाही, सातशे श्लोक त्यांनी तोंडपाठ केले. आता या श्लोकांचा अर्थ आपण लिहून काढावा, असे त्यांच्या मनात आले. रोज एका श्लोकाचा अर्थ लिहिल्याशिवाय झोपायचे नाही, असा त्यांनी निश्चय केला. आपल्या या निश्चयात त्यांनी एकदाही खंड पडू दिला नाही. सातशे श्लोकांचा अर्थ लिहायला त्यांना सातशे दिवस लागले.

दिसायला ही गोष्ट अगदी छोटीशी; पण अशा अनेक छोट्या छोट्या गोष्टींचे पालन करूनच गांधीजी खूप मोठे झाले.

चांगल्या गोष्टी एकदम करता येत नाहीत. त्यांचा सराव करावा लागतो. त्या नियमित करण्याचा निश्चय करावा लागतो. तो निश्चय पाळावा लागतो. गांधीजी नेमके हेच करत. आपण केलेला चांगला निश्चय पार पाडत असताना, चांगल्या गोष्टी करताना कोणी थट्टा केली, तरीही ते तिकडे लक्ष देत नसत. त्यांचे लक्ष असायचे ते ठरवलेली गोष्ट पूर्ण करण्याकडे !

दृढ - पक्का, ठाम
निश्चय करणे - ठरवणे
पालन करणे - पाळणे
सराव - सतत प्रयत्न
पार पाडणे - पूर्ण करणे
महात्मा - गांधीजींना लोकांनी दिलेली पदवी, महान व्यक्ती.

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे सांगा.** (५.३.१, ५.३.२)

  (१) गांधीजींचे पूर्ण नाव काय होते ?

  (२) गांधीजींच्या अंगी महत्त्वाचा असा कोणता गुण होता ?

  (३) गांधीजींनी एकदा कोणता निश्चय केला ?

  (४) श्लोक पाठ झाल्यानंतर गांधीजींनी काय ठरवले ?

  (५) चांगल्या गोष्टी करता येण्यासाठी काय करावे लागते ?

- **खालील शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.** (६.३.१)

  (१) निश्चय करणे (२) पालन करणे (३) पार पाडणे

  (४) थट्टा करणे (५) सराव करणे

- **विरुद्ध अर्थाचे शब्द लिहा.** (६.३.१)

  नियमित, पूर्ण, खंड, लक्ष.

- **आजपासून एक नवीन गोष्ट करण्याचा तुम्ही निश्चय करा. तीन महिन्यांनंतर किती प्रगती केली, ते गुरुजींना सांगा.**

  उदा. – (१) सकाळी लवकर उठणे.

  (२) आईला मदत करणे.

  (३) रोज पाच ओळी सुवाच्य अक्षरांत शुद्ध लिहिणे, इत्यादी.

- **'गांधीजींच्या गोष्टी' हे सानेगुरुजींचे पुस्तक वाचा.** (३.३.३)

**शिक्षकांनी मुलांच्या मदतीने श्लोकांचा संग्रह करावा. मुलांना तो वाचावयास द्यावा.** (३.३.३)

- **खालील शब्द काळजीपूर्वक पाहा. वाचा. लिहा.** (४.३.१, ९.३.१)

  स्वातंत्र्य, दृढ, श्लोक, निश्चय, नियमित, गुण.



# ४. गाणे अमुचे जुळे

टप् टप् पडती अंगावरती प्राजक्ताची फुले
भिर् भिर् भिर् भिर् त्या तालावर गाणे अमुचे जुळे !

कुरणावरती, झाडांखाली
ऊन-सावली विणते जाळी
येतो वारा पाहा भरारा, गवत खुशीने डुले
टप् टप् पडती अंगावरती प्राजक्ताची फुले !

दूर दूर हे सूर वाहती
उन्हात पिवळ्या पाहा नाहती
हसते धरती, फांदीवरती हा झोपाळा झुले
टप् टप् पडती अंगावरती प्राजक्ताची फुले !



१.३.१, २.३.१, २.३.२, २.३.३, ३.३.३, ४.३.१, ५.३.१, ५.३.२, ६.३.१, ९.३.१

गाणे अमुचे झुळ-झुळ वारा
गाणे अमुचे लुक-लुक तारा
पाऊस, वारा, मोरपिसारा या गाण्यातुन फुले
टप् टप् पडती अंगावरती प्राजक्ताची फुले !

फुलांसारखे सर्व फुला रे
सुरात मिसळुनि सूर, चला रे
गाणे गाती तेच शहाणे बाकी सारे खुळे !
टप् टप् पडती अंगावरती प्राजक्ताची फुले
भिर् भिर् भिर् भिर् त्या तालावर गाणे अमुचे जुळे !

कवी - मंगेश पाडगावकर

**प्राजक्त** - पारिजात, पारिजातक
**कुरण** - जनावरे चरण्याची खूप गवत असलेली जागा
**धरती** - धरणी; जमीन

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.३.१)
  (१) अंगावर कोणती फुले पडत आहेत ?
  (२) जाळी कोण विणत आहे ?
  (३) खुशीने कोण डुलत आहे ?
  (४) फुलांकडून आपण कोणता गुण घ्यावा ?
  (५) कवीने गाणे गाणाऱ्यांना काय म्हटले आहे ?
- **कवितेतील ओळी पूर्ण करा.** (५.३.२)

गाणे अमुचे .................. वारा
गाणे अमुचे .................. तारा
.............., ............., ...................... या गाण्यातुन फुले

- **समानार्थी शब्द लिहा.** (६.३.१)
झोपाळा, शहाणा, मिसळणे, खूश.

- **जोड्या जुळवा.** (५.३.२)

| | |
|---|---|
| (१) टप् टप् पडती अंगावरती | (१) गवत खुशीने डुले |
| (२) हसते धरती, फांदीवरती | (२) बाकी सारे खुळे |
| (३) गाणे गाती तेच शहाणे | (३) प्राजक्ताची फुले |
| (४) येतो वारा पाहा भरारा, | (४) हा झोपाळा झुले |

**उन्हाच्या वेळी झाडाखाली ऊनसावलीची जाळी कशी दिसते, याचे मुलांना निरीक्षण करण्यास सांगून बोलते करावे.** (२.३.३, २.३.१)

- **ही कविता सामूहिकरीत्या व साभिनय म्हणा.** (२.३.२)

- **खालील शब्द काळजीपूर्वक पाहा. वाचा. लिहा.** (४.३.१, ९.३.१)
प्राजक्त, ऊन, कुरण, सूर.

❑❑❑

# ५. शिरीषकुमार

पश्चिम खानदेशातील नंदुरबारमधील ही गोष्ट.

सकाळी सकाळीच आजीने शिरीषला हाक मारली. ''शिरीष, येतोस का लाडू वळायला ?'' ती म्हणाली.

''आजी, आज मला शाळेत लवकर जायचं आहे. झेंडा घेऊन आम्ही सारे शाळेतून बाहेर पडू आणि मिरवणूक काढू. आज ९ सप्टेंबर. महिना झाला 'चले जाव' चळवळीला.''

''इंग्रज या देशातून जाईल का ?'' आजी म्हणाली.

''आम्ही त्याला घालवू. त्यासाठी वाट्टेल ते करू अथवा मरू !''

''आधी आजीला मदत कर. ये, लाडू वळ.''

शिरीष हा सर्वांचा लाडका मुलगा होता. शाळेतील त्याचा अभ्यास चांगला होता. तो हस्तलिखित पत्रिकेत लिहायचा. मुलांना जमवून खेळ खेळायचा. घरी स्वयंपाकात मदत करायचा. विजेचा दिवा बिघडला, तर दुरुस्त करायचा. शिरीषला अशा अनेक गोष्टी करता येत.

शिरीष लाडू वळत बसला. दुसऱ्या दिवशी त्यांच्याकडे कसलातरी घरगुती कार्यक्रम होता, म्हणून तयारी चालली होती. घड्याळात अकरा वाजले. ताडकन शिरीष उठला.

''आजी, जातो ग,'' असे म्हणून तो निघून गेला.

शाळेत मुले आली होती. शिरीष येताच सारी त्याच्याभोवती जमली. ''शिरीष, ते बघ पोलीस. सरकारने मिरवणुकीला, झेंडा न्यायला बंदी घातली आहे.'' एका मुलाने माहिती दिली.

१.३.१, २.३.२, ३.३.३, ४.३.१, ५.३.१, ५.३.२, ६.३.१, ७.३.१, ९.३.१



“असू दे बंदी. पोलीस काय करतील ? फार तर लाठीमार करतील. मिरवणूक उधळून लावतील. एवढंच ना ? आपण भ्यायचं नाही. आपल्या देशाचे आपण शूर शिपाई आहोत.”

शिरीषने सर्वांना गोलाकार उभे केले. एकाच्या हातात झेंडा दिला. इतक्यात एक पोलीस झेंडा हिसकवायला आला. त्या मुलाने तो दुसऱ्याच्या हातात दिला. पोलीस तेथे गेला तोच, झेंडा तिसऱ्याच्या हातात. पोलीस चिडला आणि तणतणत निघून गेला.

मुलांनी जयजयकार केला. ‘करेंगे या मरेंगे, चालीस कोट नहीं दबेंगे’, असे जयघोष झाले.



मिरवणूक सुरू झाली. दारांतून, खिडक्यांतून मोठी माणसे लहान मुलांची हिंमत पाहत होती.

मिरवणूक मुलींच्या शाळेजवळ आली. वर्गावर्गांतून सगळ्या मुली बाहेर पडल्या. जयघोष करत त्या मिरवणुकीत सामील झाल्या. मिरवणूक कोर्टाजवळ आली आणि शिरीषने तेथे भाषण सुरू केले. वकील मंडळी बाहेर येऊन ऐकू लागली. भाषण संपले आणि मिरवणूक पुढे गेली; तेवढ्यात पाठीमागून लाठीमार आणि गोळीबार करत पोलीस आले.

मुलांची पांगापांग झाली. काही धीट मुले उभी होती. काही मुली न भिता, न पळता गल्लीच्या तोंडाशी उभ्या होत्या. पोलीस तिथे पोचले. विजेप्रमाणे शिरीष तेथे आला आणि म्हणाला, "आधी आम्हांला मारा. मुलींवर काय गोळ्या झाडता ? ही माझी छाती उघडी आहे."

अधिकाऱ्याने चिडून गोळी झाडली; पण नेम चुकला.

"जरा नीट नेम धरा. गोळ्या संपल्या नाहीत ना ?" शिरीषने विचारले आणि त्या अधिकाऱ्याने जवळून गोळ्या घातल्या. बाळ शिरीष पडला. आणि हा कोण ? हा लालदास ! शिरीषचा प्राणापेक्षाही आवडता मित्र. गोळी लागून तोही पडला. झाडाआड दहा वर्षांचा धनसुखलाल उभा होता. त्यालाही भोसकून ठार करण्यात आले. हा शशिधर आणि हा आठ वर्षांचा घनश्याम ! त्यांनाही गोळी लागली. 'पाणी ! पाणी !' शिरीष क्षीण स्वरात म्हणाला. लोकांच्या डोळ्यांत पाणी आले. एकाने पाणी आणले. तेवढ्यात पोलीस अधिकारी गरजला, "खबरदार, पाणी द्यायला पुढे याल तर गोळ्या घालू."

भारतमातेला स्वातंत्र्याचे अमृत मिळावे म्हणून त्या मुलांनी प्राण दिले. 'पाणी पाणी' करत, 'स्वराज्य', 'स्वातंत्र्य' म्हणत, महात्माजींचे नाव ओठांवर खेळवत त्या मुलांनी मरण पत्करले. ती अमर झाली ! धन्य ती तेजस्वी मुले ! धन्य तो शिरीषकुमार आणि धन्य त्याचे ते बाल सवंगडी.

लेखक - साने गुरुजी

**हस्तलिखित** - हाताने लिहिलेला मजकूर
**सवंगडी** - सोबती, मित्र

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे सांगा.** (५.३.१, ५.३.२)
  (१) शिरीषला अभ्यासाशिवाय कोणकोणती कामे करता येत होती ?
  (२) झेंडा पोलिसाच्या हाती का लागला नाही ?
  (३) मुलींवर गोळ्या घालणाऱ्या अधिकाऱ्याला शिरीष काय म्हणाला ?
  (४) शिरीषबरोबर आणखी कोणी कोणी प्राणांचे बलिदान केले ?
  (५) 'धन्य ती तेजस्वी मुले !' असे का म्हटले आहे ?

- **विरुद्ध अर्थाचे शब्द लिहा.** (६.३.१)
  मित्र, स्वतंत्र, अमृत, धीट, तेजस्वी.

- **कोण, कोणास म्हणाले ते सांगा.** (५.३.१)
  (१) "आम्ही त्याला घालवू. त्यासाठी वाट्टेल ते करू अथवा मरू !"
  (२) "आधी आम्हांला मारा. मुलींवर काय गोळ्या झाडता ?"
  (३) "खबरदार, पाणी द्यायला पुढे याल तर गोळ्या घालू."

- **वाचा.** (३.३.३)

  ही गोष्ट आहे एका क्रांतिकारक तरुण मुलीची. तिचे नाव प्रीतिलता वड्डेदार. बंगालमधील चितगाव हे तिचे गाव. ती पैशाने गरीब; पण देशभक्तीने श्रीमंत होती. त्या काळात क्रांतिकारकांच्या अनेक संघटना होत्या. भारताला स्वातंत्र्य मिळवून देण्यासाठी ह्या संघटना काम करत. मुलगी असूनही प्रीतिलता एका संघटनेची सभासद झाली. भारताच्या स्वातंत्र्यासाठी ती प्राण तळहातावर घेऊन इंग्रजांशी लढली आणि अमर झाली.

- **या गोष्टीतील प्रसंग नाटकरूपाने वर्गासमोर सादर करा.** (२.३.२)
- **देशाला स्वातंत्र्य मिळावे म्हणून आत्मबलिदान केलेल्या हुतात्म्यांची माहिती मिळवा व त्यांच्या चित्रांचा संग्रह करा.** (७.३.१)
- **खालील शब्द काळजीपूर्वक पाहा. वाचा. लिहा.** (४.३.१, ९.३.१)
  इंग्रज, स्वराज्य, स्वातंत्र्य, अमृत, हस्तलिखित.



# ६. चणिया



हा आपला चणिया. चणिया तुमच्याच वयाचा आहे. तो गावात राहत नाही. तो रानावनात राहतो. डांबरी रस्ते त्याने पाहिलेले नाहीत, मग आगगाडी आणि मोटार यांची तर गोष्टच सोडा !

चणिया ज्या ठिकाणी राहतो, तिथल्या पाऊलवाटा त्याला बिनचूक माहीत आहेत. जंगलातील झाडन् झाड त्याच्या ओळखीचे आहे. तुम्ही त्याला विचारले, तर साऱ्या झाडांची नावे तो तुम्हांला पटापट सांगेल ! कोणत्या झाडाला फळ केव्हा येते, त्याचा रंग कसा असतो, ते गोड असते की आंबट असते, या साऱ्या गोष्टी चणियाला ठाऊक आहेत. जंगलात कोणत्या झाडावर कोणते पक्षी असतात, त्यांची घरटी कशी असतात, याचे वर्णन तर तो खूपच छान करतो. त्यांच्या कितीतरी गमतीजमती तो सांगतो. वेगवेगळ्या पक्ष्यांच्या आवाजांची हुबेहूब नक्कल करावी तर ती या चणियानेच !

१.३.१, ३.३.३, २.३.४, ४.३.१, ४.३.३, ५.३.१, ५.३.२, ६.३.१, ९.३.१

रानावनात भटकणारे प्राणी हीच चणियाची दोस्त मंडळी. हत्ती, वाघ, अस्वल, रानरेडा, रानडुक्कर, वनगाय असे कितीतरी प्राणी जंगलात असतात. त्या सर्वांची चणियाला बिनचूक माहिती आहे. प्राण्यांच्या पावलांच्या ठशांवरूनही चणिया ते ठसे कोणत्या प्राण्यांचे असावेत, हे सहज सांगू शकतो. जंगलातल्या सर्व प्राण्यांबद्दल चणियाला फार फार प्रेम वाटते. ते प्राणी चवताळून कधी अंगावर आले, तर त्यांच्यापासून तो आपला बचावही करून घेतो.

हे चणियाचे घर. घर कसले ? ही तर गुहाच ! ही गुहा म्हणजेच चणियाचे घर ! यात किती काळाकुट्ट अंधार आहे, पाहिलेत ? या घरात सतत एक दिवटी तेवत असते. त्या दिवटीच्या उजेडात घरातील सारी कामे चालतात.



चणिया आणि त्याचे सगळे भाऊबंद काम करून मिळेल ते खाऊन कसेबसे जगतात. ते डोंगराच्या उतरणीवरील जमीन तयार करतात. नांगर आणि ट्रॅक्टर त्यांना माहीत नाही. ते जमीन खणतात, माती मोकळी करतात आणि लागवडीसाठी जमीन तयार करतात. पावसाळ्यात भात लावतात. भाताचे कोंब दिसू लागले, की ते आपल्या शेताला काटेरी कुंपण घालतात. हरिण आणि रानडुक्कर यांसारख्या प्राण्यांपासून पिकाला खूप जपावे लागते. त्यासाठी रात्रंदिवस शेताची राखण करावी लागते. पक्ष्यांचे थवे, माकडांच्या टोळ्या यांच्यापासूनही पिकाचे रक्षण करावे लागते.

पिकाची राखण करताना चणिया सफाईने गोफणगुंडा चालवतो. तरीदेखील काही पक्षी आणि माकडे त्याची नजर चुकवून हळूच पिकात शिरतातच.

पुरेसे पीक आले नाही, तर कंदमुळे खाऊन चणिया आणि त्याचे भाऊबंद कसेतरी दिवस काढतात. चणिया आणि त्याचे भाऊबंद कधीही एकमेकांशी भांडत नाहीत. एकाचे सुख तेच साऱ्यांचे सुख आणि एकाचे दुःख तेच साऱ्यांचे दुःख. डोंगर, नद्या, झाडीझुडी, फुलेफळे, पशुपक्षी हेच त्यांचे साथीदार ! जंगलातच ते लहानाचे मोठे होतात. जंगल हेच त्यांचे घर, जंगल हेच त्यांचे जग !

लेखक - शिवराम कारंत

**हुबेहूब** - सारखे
**गुहा** - डोंगराच्या आतील भागातील पोकळ जागा
**दिवटी** - लहान मशाल
**भाऊबंद** - नातेवाईक
**कोंब** - अंकुर, मोड

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे लिहा.** (५.३.१, ५.३.२)

  (१) चणिया कोठे राहतो ?

  (२) चणिया झाडांबद्दलची कोणकोणती माहिती सांगतो ?

  (३) चणियाचे घर कोणते ?

  (४) चणियाचे भाऊबंद शेताला कुंपण केव्हा घालतात ?

  (५) पिकाची राखण करण्यासाठी चणिया काय करतो ?

  (६) चणिया आणि त्याचे भाऊबंद एकमेकांशी कसे वागतात ?

- **खालील शब्दसमूहांचा वाक्यांत योग्य ठिकाणी उपयोग करा.** (६.३.१)
  चवताळून अंगावर येणे, कसेबसे जगणे, रक्षण करणे, सफाईने चालवणे

  (१) माझा भाऊ गर्दीतून सायकल ..............................

  (२) राजाभाऊंचा कुत्रा नवीन माणूस दिसला, की ..............................

  (३) सैनिक देशाचे ..............................

  (४) दुष्काळ पडल्यावर गरीब लोक ..............................

- **पाठात 'बिनचूक' हा शब्द आला आहे. 'चूक' या शब्दाच्या मागे 'बिन' हा उपसर्ग लागला आहे. यासारखे आणखी चार शब्द सांगा.** लिहा. (९.३.१)

- **शेतकरी पिकांची राखण करण्यासाठी काय काय करतात, याची माहिती त्यांना भेटून मिळवा. ती पाच-सहा वाक्यांत लिहा.** (४.३.३)

- **तुम्हाला चणिया भेटला, तर त्याच्या आनंदाविषयी व दुःखाविषयी कोणते प्रश्न विचाराल ते सांगा.** (२.३.४)

- **खालील शब्द काळजीपूर्वक पाहा. वाचा. लिहा.** (४.३.१, ९.३.१)
  हुबेहूब, बिनचूक, दिवटी, भाऊबंद.



# ७. ज्योत




आधी होते मी दिवटी
शेतकऱ्यांची आवडती
झाले इवली मग पणती
घरांघरांतुन मिणमिणती !





समई केले मला कुणी
देवापुढती नेवोनी
निघुनी आले बाहेर
सोडित काळासा धूर !




काचेचा मग महाल तो
कुणी बांधुनी मज देतो
कंदिल त्याला जन म्हणती
मीच तयातिल परि ज्योती.



बत्तीचे ते रूप नवे
पुढे मिळाले मज बरवे
वरात मजवाचून अडे
झगझगाट तो कसा पडे !





आता झाले मी बिजली
घरे मंदिरे लखलखली
नाही ठाऊक काय पुढे
नवा बदल माझ्यात घडे.

१.३.१, २.३.२, ३.३.३, ४.३.१, ४.३.३, ५.३.१, ५.३.२, ६.३.१, ९.३.१

एकच ठावे काम मला
प्रकाश द्यावा सकलांला
कसलेही मज रूप मिळो
देह जळो अन् जग उजळो !!



कवी - वि. म. कुलकर्णी

| | |
|---|---|
| बरवे - चांगले | ठावे - माहीत असणे |
| सकल - सगळे | देह - शरीर |

(कवितेमध्ये वृत्तनियमासाठी 'कंदील' हा शब्द ऱ्हस्व आला आहे.)

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे लिहा.** (४.३.३, ५.३.१)
  (१) ज्योतीच्या कोणकोणत्या रूपांची नावे या कवितेत आली आहेत ?
  (२) ज्योत कोणते काम नेहमीच करते ?
  (३) ज्योतीचा कोणता गुण घेण्यासारखा आहे ?
- **पुढील अर्थाचे कवितेत आलेले शब्द सांगा.** (६.३.१)
  (१) मला, लहानशी, लोक, चांगले, वीज, सर्वांना, त्यामधील.
  (२) निघून, सोडत, नेऊन, बांधून, म्हणतात.
- **खालीलपैकी तुम्हांला आवडतील ती चित्रे काढा व त्यांची माहिती तीन-चार वाक्यांत लिहा.** (४.३.३)
  पणती, समई, कंदील, बत्ती, विजेचा दिवा.
- **विरुद्धार्थी शब्द लिहा.** (६.३.१)
  आवडती, नवे, महाल, प्रकाश, काळा.
- **कवितेत नसलेल्या; परंतु तुम्हांला माहीत असलेल्या, उजेड देणाऱ्या वस्तूचे नाव लिहा ?**
- **कवितेतील तुम्हांला आवडलेले कडवे लिहा.** (५.३.२, ४.३.१)
- **खालील शब्द काळजीपूर्वक वाचा. लिहा.** (४.३.१, ९.३.१)
  कंदील, ज्योती, मंदिर, ठाऊक, धूर.



| ८. | चित्रे |
|---|---|

घरातील फरशी पुसून झाली. आई दमून गेली. तिने बिम्मला रस्त्यावर जाऊ नको म्हणून बजावले आणि ती तेथेच आडवी झाली. बब्बी शेजारी खेळायला गेली.

बिम्मला एकटे वाटू लागले. तो इकडे तिकडे रेंगाळला. मग तो सोप्यावर आला. खुर्चीवर उभे राहून त्याने कपाट उघडले. त्यात गमतीच्या पुष्कळ वस्तू होत्या. हिरव्या काचेची दौत, तांबड्या मेणबत्त्या, बंद पडलेले जुने घड्याळ, रंगीत दोरे, हिरव्या-निळ्या मण्यांचा झगा घातलेली एक हात मोडलेली काचेची बाहुली, अंग दाबताच पत्र्याच्या बटणामधून कुई आवाज करणारे रबरी बदक ! पण त्या साऱ्यांत बिम्मला फार आवडला तो रंगीत खडूंचा डबा ! त्याने दोन-चार खडू घेतले आणि तो हलकेच आत आला.



१.३.१, ३.३.३, ४.३.१, ४.३.३, ५.३.१, ६.३.१, ९.३.१

स्वच्छ केलेल्या फरशीचे मोठे चौकोन जणू बिम्मचीच वाट पाहत थांबले होते. तो मांडी घालून खाली बसला आणि वाकून त्यांवर चित्रे काढू लागला. थोड्याच वेळात जवळजवळ सगळी फरशी चित्रांनी भरून गेली. इतक्यात आई जागी होऊन उठून बसली. समोरचे सारे काही पाहून तिने कपाळाला हात लावला.

''आत्ताच मी फरशी पुसून ठेवली होती. काय ही गिजबिज करून ठेवली आहेस तू या फरशीवर?'' ती थोड्या नाराजीने बिम्मला म्हणाली.

''ही गिजबिज नाही काही. ही सगळी चित्रं आहेत,'' बिम्म म्हणाला. पण त्याला थोडे वाईट वाटले; त्याचा चेहरा उतरला. तेव्हा आई त्याला समजावत म्हणाली,

''बरं, ही गिजबिज नाही. तू ही कसली चित्रं काढली आहेस ते तरी सांग मला.''

बिम्म खुलला आणि म्हणाला, ''हे चित्र हत्तीचं आहे. तो फिरायला निघाला आहे. या त्याच्या दोन घंटा.''

घंटा हत्तीपेक्षा थोड्या मोठ्याच होत्या! हत्तीची शेपटी व त्याची सोंड सारखीच होती!





''आणि ते दुसरं चित्र ?'' आईने विचारले.

''अगं ते आपलं घर नाही का ?'' आश्चर्य दाखवत बिम्म म्हणाला, ''तू, बब्बी, बाबा, मी—सगळेजण बाहेर थांबलो आहोत.''

आई म्हणाली, ''होय, सगळ्यांना बाहेर थांबणं जरूरच आहे.''

घर इतके लहान होते, की बिम्मलादेखील वाकून आत जाता आले नसते. बाबांचे हात पावलापर्यंत लांबले होते. जागा कमी पडल्यामुळे आईला बाबांच्या गुडघ्यापर्यंतच्या उंचीवर समाधान मानावे लागले होते. त्यापुढील चित्रात बाजार होता, शाळा सुटली होती, तीन कोंबडे होते. आईला मात्र चित्रकलेतील काही माहीत नसल्यामुळे तिला सगळेच विचारून घ्यावे लागले. आई घरात जाण्यासाठी वळली; पण बिम्मने तिला थांबवून म्हटले,

''आई, आणखी एक चित्र आहे. ते मी तुला काढूनच दाखवतो.''

एका फरशीवर बिम्मने उभी रेघ काढली. त्यावर डोके आले, गुडघ्याखाली पोचणारे हात आले. त्यांना पालवी फुटल्याप्रमाणे बोटांच्या जागी लहान रेघा आल्या. मग बिम्मने पुन्हा रेघा ओढून एक मुलगा दाखवला. बाजूला खूप गोल काढत त्याने एक ढीग दाखवला आणि मान वर करून आईच्या चेहऱ्याकडे पाहिले.



"आता हे आणखी काय आहे ?" तिने विचारले.

"अगं, हा मी बिम्म नव्हे का ? आणि ती तू आहेस. तू ढीगभर लाडू केले आहेस आणि तू बिम्मला एक, एक नव्हे दोन लाडू देत आहेस !" बिम्मने समजावून सांगितले.

आता मात्र आई मोठ्याने हसू लागली. ती म्हणाली, "असं आहे का हे चित्र ? लबाड चित्रकार ! आई बिम्मला लाडू देत आहे का ? छान !" तिने डबा उघडला आणि बिम्मला दोन लहान लहान लाडू दिले. "हे तुझं चित्र आता मात्र अगदी खरं खरं झालं बघ !" ती म्हणाली.

लेखक - जी. ए. कुलकर्णी

सोपा - घराची ओसरी गिजबिज - गिचमिड
खुलणे - आनंदित होणे

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे सांगा.** (५.३.१)
  (१) बिम्मच्या घरी कपाटात कोणकोणत्या वस्तू होत्या ?
  (२) बिम्मने कोणकोणती चित्रे काढली ?
  (३) तुम्हांला कोणत्या चित्राचे वर्णन सर्वांत जास्त आवडले ?
  (४) 'हे तुझं चित्र आता मात्र अगदी खरं खरं झालं बघ !' असे आई कोणत्या चित्राबद्दल म्हणाली ?

- **खाली दिलेल्या अधोरेखित शब्दांसाठी पाठात आलेले शब्द शोधून लिहा.** (६.३.१)
  (१) गिचमिड करून ठेवणे.
  (२) आवाज न करता आत येणे.
  (३) वाईट वाटल्याने हिरमुसणे.
  (४) आनंदित होणे.

- **वाक्यांत उपयोग करा.** (६.३.१)
  कपाळाला हात लावणे, चेहरा उतरणे, समाधान मानणे.

- **विरुद्धार्थी शब्द सांगा. लिहा.** (६.३.१)
  बंद, खाली, बाहेर, लहान, लांब, खरे.

- **तुमच्या आवडीचे चित्र काढा. त्याचे वर्णन पाच ओळींत लिहा.** (४.३.३)

- **खालील शब्द काळजीपूर्वक वाचा. लिहा.** (४.३.१, ९.३.१)
  चित्र, बिम्म, बब्बी, हत्ती, स्वच्छ, पुष्कळ, घड्याळ.



# ९. अशी असावी मैत्री



एका अरण्यात एक छोटासा हरिण होता. मध्येच तो आपला कळप सोडून एकटाच रानावनात भटकायचा. असाच भटकत असताना एकदा त्याला एका शिकाऱ्याने पकडले. शिकाऱ्याने त्याला ठार मारले नाही. त्याने त्याला राजवाड्यात नेले. राजपुत्राला तो हरिण फार आवडला. त्याने शिकाऱ्याला बक्षीस दिले आणि तो हरिण ठेवून घेतला.

राजपुत्र त्या हरणाचे खूप लाड करायचा. त्याला अंघोळ घालायचा, खायला चांगले कोवळे कोवळे, हिरवे गवत द्यायचा. त्या हरणाला मात्र तेथे काही करमेना. तो नेहमी दुःखी असायचा; म्हणून एक दिवस राजपुत्राने त्या हरणाला अरण्यात सोडून दिले.

हळूहळू त्या हरणाची उंदीर व कावळा यांच्याशी मैत्री जमली. एक दिवस एक कासवही त्यांना येऊन मिळाला. तेव्हा उंदीर कासवाला म्हणाला, ''अरे, तू तलाव सोडून इथं कशाला बरं आलास ? एखादा शिकारी आला, तर आम्ही कोणीही त्याच्या हाती लागणार नाही. हा हरिण बघता बघता पळून जाईल, कावळा उडून जाईल आणि मी एखाद्या बिळात शिरेन. तुला मात्र यांतलं काहीच जमणार नाही. मग तुझं कसं होणार ? तू आपला परत जा कसा.''

१.३.१, ४.३.१, ५.३.१, ५.३.२, ९.३.१

तेव्हा कासव म्हणाला, “अरे, असं म्हणू नकोस. मी तुमच्याशी मैत्री करण्यासाठी आलो आहे. संकटकाळी उपयोग व्हावा; म्हणून शहाण्यांनी जिवाला जीव देणारे असे मित्र जोडावेत. ज्याने मित्र जोडला नाही, त्याला संकटातून वाचण्याची आशा नसते.”



असे त्यांचे बोलणे चालू होते, इतक्यात हातात धनुष्यबाण घेतलेला एक शिकारी तेथे आला. त्याला पाहताच उंदीर बिळात शिरला. कावळा उडून झाडाच्या शेंड्यावर बसला. हरिण सुसाट पळत सुटला. बिचारा कासव मात्र जमिनीवरूनच हळूहळू चालू लागला. तेवढ्यात शिकाऱ्याने कासवाला पकडले; पिशवीत टाकले. पिशवीचे तोंड एका दोरीने बांधले आणि पिशवी खांद्यावर टाकून तो जाऊ लागला.

शिकारी कासवाला पकडून नेत आहे, हे पाहून उंदराला अतिशय वाईट वाटले. तो रडू लागला. इतक्यात हरिण आणि कावळा तेथे आले. त्यांनाही अत्यंत दुःख झाले; पण ही वेळ दुःख करत

बसण्याची नाही, हे त्यांनी ओळखले. आपल्या मित्राचे प्राण धोक्यात आहेत, त्याला काहीही करून सोडवले पाहिजे, असे त्यांनी ठरवले.

कावळा म्हणाला, “आता मी सांगतो तसं करू या. तो शिकारी ज्या मार्गानं गेला त्या मार्गानंच हरणानं जावं आणि एखाद्या तळ्याच्या काठी अगदी निपचित पडून राहावं. मी त्याच्या डोक्यावर बसून चोचीनं खरवडल्यासारखं करीन. शिकाऱ्याला वाटेल हरिण मेलेला आहे. तो कासवाला खाली ठेवून हरणाजवळ जाईल. त्याच क्षणी हरणानं ताडकन उठून पळून जावं. शिकारी त्याचा पाठलाग करू लागेल. तेवढ्यात उंदरानं पिशवीचा बंध तोडून टाकावा. कासवानं पिशवीतून बाहेर पडावं आणि तळ्यात शिरावं.”

कावळ्याने सांगितलेली ही युक्ती सर्वांना एकदम पसंत पडली आणि सर्वजण आपापल्या कामाला लागले.



तळ्याच्या काठावर हरिण निपचित पडलेला असून कावळा त्याला चोचीने टोचत आहे हे शिकाऱ्याने पाहिले. खूप दमल्याने हा हरिण मरून पडला असावा असे शिकाऱ्याला वाटले. शिकाऱ्याला

आनंद झाला. त्याने ताबडतोब कासवाला खाली ठेवले व हरणाकडे धाव घेतली. तेवढ्यात उंदराने पिशवीचे बंध कुरतडून तोडून टाकले. कासव पिशवीतून बाहेर पडला आणि झटकन तळ्यात शिरला. तेवढ्यात तो हरिणही ताडकन उठला व वाऱ्याच्या वेगाने धावत सुटला. कावळा उडून गेला. हा प्रकार पाहून तो शिकारी गोंधळला. मागे वळून बघतो तो कासवही पसार. आपली चूक शिकाऱ्याच्या लक्षात आली. पश्चात्ताप करत तो निघून गेला.

शिकारी निघून गेल्यावर उंदीर, कावळा, हरिण व कासव असे ते चौघे मित्र एकत्र आले. त्यांनी एकमेकांना आलिंगन दिले. कासव म्हणाला, ''संकटातून सुटलो बुवा एकदाचे. मैत्रीमुळेच बचावलो.'' आणि पुढे ते सुखाने एकत्र राहू लागले.

लेखक - श्रीकांत गोवंड

**निपचित** - हालचाल न करता
**आलिंगन देणे** - एकमेकांना कडकडून भेटणे, मिठी मारणे

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे सांगा.** (५.३.१, ५.३.२)
  (१) राजपुत्राने हरणाला अरण्यात का सोडले ?
  (२) कासवाने कोणाकोणाशी मैत्री जमवली ?
  (३) शिकाऱ्याला पाहताच उंदीर, कावळा, हरिण यांनी काय केले ?
  (४) कासवाला संकटातून सोडवण्यासाठी त्याच्या मित्रांनी काय ठरवले ?
- **कोण कोणास म्हणाले ते सांगा.** (५.३.१)
  (१) ''मी तुमच्याशी मैत्री करण्यासाठी आलो आहे.''
  (२) ''आता मी सांगतो तसं करू या.''
  (३) ''मैत्रीमुळेच बचावलो.''

• **पाठातील शब्द शोधून खालील वाक्ये पूर्ण करा.** (५.३.२)

(१) तळ्याच्या काठावर हरिण .................... पडलेला होता.

(२) उंदराने पिशवीचा .................... तोडून टाकला.

(३) तो हरिणही .................... उठला व .................... वेगाने धावत सुटला.

(४) कावळ्याने सांगितलेली .................... सर्वांना एकदम पसंत पडली.

• **खालील कोड्यात काही प्राण्यांच्या राहण्याच्या जागा लपलेल्या आहेत. त्या शोधा. त्यांची नावे लिहा.** (९.३.१)
(नाही सापडल्यास १ पासून सुरुवात करून क्रमाने पाहा.)

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ५ खु | ६ रा | २५ ल | २१ डे | २० झा |
| ४ पा | ८ बा | ७ डे | २२ घ | २३ र |
| ३ खो | १० त | ९ ग | १९ ली | २४ कु |
| १८ ढो | २ ठा | ११ बे | १४ हा | १५ त |
| १ गो | १२ ला | १३ गु | १७ व | १६ ला |

• **खालील शब्द काळजीपूर्वक वाचा. लिहा.** (४.३.१ ९.३.१)
हरिण, बक्षीस, जीव, मित्र, निपचित, पसंत, पश्चात्ताप.



# १०. प्रात:काळ

प्रात:काळची आरोग्यदायी हवा । सदासर्वदा मानवते जीवा ।
प्रसन्नता देई ऋतु तेधवा । सर्व प्राणीमात्रांसी ॥
सर्व रानेवने जागी होती । पुष्पे सारी विकास पावती ।
पशुपक्षीही नेहमी उठती । प्रात:काळी ॥
कोणी धावावे, कुणी चालावे । कोणी सूर्यनमस्कार घालावे ।
कोणी गावे, अध्ययन करावे । हे दृश्य प्रभाती दिसावे ॥
घरा-परिसराची करावी सफाई । स्वच्छता मार्गी ठायी ठायी ।
गायीम्हशींचे गोठे सर्वही । आरशासारखे करावे ॥
लहानथोरांनी साहाय्य द्यावे । परि प्रत्येकाने काम करावे ।
सर्वांनी मिळोनि उरकावे । कामधंदे चटपट ॥
काही पठणपाठण करावे । शरीर मनासी वळण लावावे ।
आयुष्य सुंदर होते आघवे । ऐशा क्रमे ॥

कवी - राष्ट्रसंत तुकडोजीमहाराज



**प्रात:काळ** - सकाळची वेळ, पहाट **तेधवा** - तेव्हा **आघवे** - संपूर्ण

१.३.१, २.३.२, २.३.३, ४.३.१, ४.३.३, ५.३.१, ५.३.२, ६.३.१, ९.३.१

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे तीन ते चार वाक्यांत लिहा.** (५.३.१, ५.३.२)
  (१) प्रातःकाळची हवा अधिक चांगली असते असे का म्हटले आहे ?
  (२) शरीराला वळण लावण्यासाठी पहाटे उठून काय काय करावे ?
  (३) मनाला वळण लावण्यासाठी पहाटे उठून तुम्ही काय कराल ?
  (४) तुमच्या घरातील माणसांना पहाटेच्या कोणकोणत्या कामांत तुम्ही मदत करता ?

- **खालील शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.** (६.३.१)
  साहाय्य करणे, मिळून उरकणे, आरशासारखे करणे.

- **कवितेच्या ओळी पूर्ण करा.** (५.३.२)
  काही .................... करावे ।
  .................... .................... वळण लावावे ।
  आयुष्य .................... .................... आघवे । ऐशा क्रमे ॥

- **पहाटे उठून आपल्या भोवतालच्या परिसरात फिरून या. त्या वेळी तुम्हांला दिसलेल्या दृश्यांचे वर्णन दहा वाक्यांत लिहा.** (४.३.३)

- **लिहा.** (९.३.१) **जसे - करावे – कर, करणे.**
  लावावे – .................... .................... धावावे – .................... , ....................
  उरकावे – .................... .................... घालावे – .................... , ....................

- **कवितेत आलेले जोड शब्द शोधा. लिहा.** (६.३.१, ९.३.१)
  **जसे** – सदासर्वदा.
  .................... .................... ....................
  .................... .................... ....................

- **खालील शब्द काळजीपूर्वक वाचा. लिहा.** (४.३.१, ९.३.१)
  प्रातःकाळ, ऋतू, प्रसन्न, दृश्य, आयुष्य.



# ११. कंधारची सहल

कंधार येथे नुकतीच शाळेची सहल गेली होती. सहलीत काय काय पाहिले, याची माहिती लिहून आणायला गुरुजींनी सांगितली होती; त्यामुळे आज वर्गातील सर्वच मुले आपापल्या वहीत लिहून ठेवलेली माहिती वाचण्यात गर्क होती. तेवढ्यात गुरुजी वर्गात आले.

गुरुजी : मुलांनो, काल सांगितल्याप्रमाणे कंधारच्या सहलीची माहिती तुम्ही लिहून आणली असेल. मी ज्याला सांगेन त्याने पुढे येऊन लिहून आणलेली माहिती वाचायची. बोला, आधी कोण वाचणार ? (रवी, कांचन, रोहित यांनी हात वर केले.) हं, रोहित, चल, तू पुढे ये. (रोहित पुढे येऊन लिहिलेली माहिती वाचू लागला.)

रोहित : बस गावात प्रवेश करण्यापूर्वी टेकडीवरून कंधारचा सुंदर परिसर दिसतो. हिरवी हिरवी झाडी आणि गावालगतच असलेला तलाव लांबूनच नजरेत भरतो. कंधार हे एके काळी राजधानीचं नगर होतं. कन्हारपूर, कृष्णपूर किंवा कंधारपूर अशी अनेक नावं या नगराला होती. कंधार, बहाद्दरपुरा, मानसपुरी ही तीन गावं मिळून जुन्या काळचं कंधारपूर हे नगर बनलं होतं. कधी-काळी सुंदर वास्तूंनी, बगिच्यांनी आणि थुईथुई नाचणाऱ्या कारंज्यांनी कंधार नगरी शोभिवंत दिसत होती. आज त्यांतील काहींचे अवशेष तेवढे शिल्लक आहेत.

गुरुजी : रोहित, थांब ! मुलांनो, आता आपण कंधारचं वर्णन ऐकत होतो. पण हे कंधार गाव कुठं आहे ? तू सांग कांचन.

१.३.१, ३.३.३, ४.३.१, ४.३.३, ५.३.१, ५.३.२, ६.३.१, ९.३.१



राष्ट्रकूट भवन

कांचन : कंधार नांदेड जिल्ह्यात असून ते तालुक्याचं ठिकाण आहे.

गुरुजी : गणू, तू सहलीला आला नव्हतास. त्यामुळे कंधार पाहिलं नाहीस; पण त्या भिंतीवरील नकाशात 'कंधार' कुठं आहे ते दाखवशील ? (गणूने भिंतीवरील नकाशात 'कंधार' गाव दाखवले.)

गुरुजी : अगदी बरोबर ! चला, पुढची माहिती रवी तू सांग.

रवी : कंधारच्या परिसरात राष्ट्रकूट काळातील असंख्य शिल्पावशेष सापडले आहेत. हे सर्व शांतिघाटाजवळील राष्ट्रकूटभवनातील संग्रहालयात ठेवलेले आहेत. काही शिल्पावशेष येथील भुईकोट किल्ल्यात ठेवण्यात आले आहेत. त्रिमुखी, षणमुख, चतुर्भुज, अष्टभुज, दशभुज अशा लहानमोठ्या आकारांतील मूर्ती इथे बघायला मिळतात. बहाद्दरपुरातील 'सर्वलोकाश्रय' मंडपात (बारा हातांची)

'द्वादशभुजा' देवीची एक मूर्ती आहे. गणेशाची प्रचंड मूर्ती कंधारच्या शिवेवर आहे. महिषासुरमर्दिनी देवीची चार ते पाच फूट उंचीची सुंदर मूर्ती शिवाजी कॉलेजच्या परिसरात आहे.

शौकत : गुरुजी, शिल्पावशेष म्हणजे काय ?

गुरुजी : शिल्प म्हणजे दगडातून बनवलेल्या कोरीव मूर्ती. अशा शिल्पांचे अवशेष म्हणजे आज उरलेले भाग. सुमारे एक हजार वर्षांपूर्वीचा राष्ट्रकूट राजा तिसरा कृष्ण याच्या काळातील ही शिल्पे आहेत. भैरव, चल. तू सांग पुढील माहिती.

भैरव : मला सर्व मूर्तींमध्ये साठ फूट लांबीची क्षेत्रपालाची मूर्ती खूप महत्त्वाची वाटली. या क्षेत्रपालाच्या मूर्तीचे फक्त एक कान, दोन हात, चेहऱ्याचे दोन मोठे भाग, एक मोठा पाय एवढेच भाग आज येथे आहेत. भारतातीलच नव्हे, तर जगातील एक अत्यंत भव्य मूर्ती म्हणून क्षेत्रपालाच्या मूर्तीकडे पाहिले जाते.

गुरुजी : सदू, आता तू सांग.

सदू : एक हजार वर्षांपूर्वीचा भुईकोट किल्ला आणि 'जगतुंग समुद्र' नावाचा तलाव ही कंधार येथील आणखी दोन महत्त्वाची ठिकाणे आहेत. सुमारे चोवीस एकर जागेत हा भक्कम किल्ला बांधलेला आहे. किल्ल्यात सर्वांत उंच जागी 'अंबरी' तोफ ठेवली आहे. ही तोफ पंचधातूंची आहे. प्रचंड तटबंदी आणि अनेक इमारती तिथे आहेत. एक सदैव पाण्यानं भरलेली विहीरही आत आहे. किल्ल्याभोवती खंदक आहे. खंदकात येणारं पाणी 'जगतुंग समुद्र' या तलावातून येतं. एक हजार वर्षांपूर्वी बांधलेला हा तलाव आजही उपयुक्त आहे.



भुईकोट किल्ला

← खंदक



← जगतुंग समुद्र (तलाव)

एवढ्यात मधल्या सुटीची घंटा झाली. गुरुजी म्हणाले, ''तुम्ही सर्वांनी छान माहिती सांगितली. आपली सहल खऱ्या अर्थाने आज पूर्ण झाली.''

| | |
|---|---|
| **गर्क** - दंग, तल्लीन | **वास्तू** - इमारत, घर |
| **अवशेष** - उरलेले भाग | **भुईकोट** - सपाट जमिनीवर बांधलेला किल्ला |
| **त्रिमुखी** - तीन तोंडांची | **षण्मुख** - सहा तोंडांची |
| **चतुर्भुज** - चार हात असलेली | **अष्टभुज** - आठ हात असलेली |
| **दशभुज** - दहा हात असलेली | |

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे लिहा.** (५.३.१)

  (१) जुन्या काळी कंधार कोणकोणत्या नावांनी ओळखले जात होते ?

  (२) कंधार येथील शिल्पावशेष कोठे ठेवले आहेत ?

  (३) कंधारच्या भुईकोट किल्ल्यात कोणकोणत्या मूर्ती आहेत ?

  (४) भैरवने क्षेत्रपालाच्या मूर्तीबद्दल कोणती माहिती सांगितली ?

- **पाठाच्या आधारे खालील वाक्ये पूर्ण करा.** (५.३.२)

  (१) कंधार हे .............. जिल्ह्यात आहे.

  (२) जगातील अत्यंत भव्य मूर्ती म्हणून .............. मूर्तीकडे पाहिले जाते.

  (३) कंधारलगतच्या तलावाला .............. असे म्हणतात.

  (४) अंबरी तोफ ..............ची आहे.

- **समानार्थी शब्द लिहा.** (६.३.१)

  प्रचंड .............. समुद्र ..............

  सदैव .............. नगर ..............

  तलाव ..............

- **जवळपासच्या एखादया प्रसिद्ध स्थळाला भेट देऊन तेथे काय पाहिले, त्याची माहिती पत्र लिहून मित्रास कळवा.** (४.३.३)

- **खालील शब्द काळजीपूर्वक वाचा. लिहा.** (४.३.१ ९.३.१)

  शिल्पावशेष, क्षेत्रपाल, राष्ट्रकूट, मूर्ती.



# १२. मी क्रिकेट खेळतो

**मुलांनो, तुमच्याच वयाच्या छोटूने खालील निबंध लिहिला आहे. त्यात चित्रे आणि शब्द यांचा मजेदार खेळ आहे. वाचा. तुम्हालाही आवडेल.**

---

दिवाळीच्या सुटीत मी आजीच्या गावी गेलो होतो. आजीचं गाव अगदीच लहान आहे; त्यामुळे सुरुवातीला मला तिथे अजिबातच करमलं नाही. नंतर हळूहळू मला तिथे काही मित्र मिळाले. राजू, शंकर, शिवाजी, शकील, जॉन, रामू आणि ॲना या साऱ्या मित्रांबरोबर मी खूप खूप खेळलो. त्यातला क्रिकेटचा खेळ मी कधीच विसरणार नाही.

त्या दिवशी आम्ही क्रिकेट खेळायचं असं ठरवलं होतं. जॉन आणि रामू या दोघांनी फुटबॉल खेळायचा आग्रह धरला. शेवटी क्रिकेट खेळायचं निश्चित झालं.

राजूनं आणला 

शंकरनं आणली 

एका संघाचा कॅप्टन शंकर, तर दुसऱ्या संघाचा कॅप्टन शकील होता. मी मात्र शकीलच्या संघात होतो.

शकीलनं  जिंकला आणि आधी खेळण्याचा निर्णय घेतला. सलामीला मीच खेळायला आलो.



रबरी असल्यामुळे न बांधताच खेळू लागलो. खूप धावा करण्याच्या निश्चयानं खेळत होतो; पण एकही धाव न काढताच मी बाद झालो. शिवाजी आणि शकीलनं खेळ चांगला केला. वीस षटकांत आमच्या एकूण एकशे अकरा धावा झाल्या.

प्रतिस्पर्धी संघातील शंकर आणि राजू दोघंही जिंकण्याच्या इच्छेनं भराभर धावा जमवू लागले. मी अचूक  वर  फेकला; त्यामुळे दोघंही एका पाठोपाठ   झाले खेळात खूपच रंगत आली. शंकरच्या संघाला जिंकण्यासाठी दोन धावा हव्या होत्या. शेवटच्या षटका-तील एकच  शिल्लक राहिला होता. रामू  करत होता.

जॉनची  होती. जॉनने

जोराचा फटका मारला.  उंच उडाला.

मी धावत जाऊन घेण्याचा

प्रयत्न केला. त्या प्रयत्नात पाय घसरून

जमिनीवर खूप लांबपर्यंत घरंगळत गेलो.

जमिन कठीण असल्याने हाताला बरंच

खरचटलं. खूप रक्त वाहू लागलं. तेव्हा

सगळ्यांची धावपळ उडाली. गावामध्ये

 नव्हतं डॉक्टरसुद्धा नव्हते.

तालुक्याला जावं तर  नव्हती.

शेवटी शहाजी पाटलांच्या 

मधून मला तालुक्याच्या

 मध्ये नेण्यात आलं.

आठ दिवस माझा हात  मध्ये होता.

घरी आल्यावर माझ्या सर्व मित्रांनी

माझं अभिनंदन केलं. माझ्या हाताला

लागलेलं असतानाही मी हातातून  खाली पडू दिला नाही. त्यामुळेच आमचा संघ सामना जिंकू शकला, याचा मला खूप आनंद झाला.

लेखक - माधव राजगुरू

## स्वाध्याय

- वरील पाठाचे वाचन करा. (३.३.२)

वरील पाठामध्ये नामवाचक शब्दांऐवजी त्यांची चित्रे दिली आहेत. त्यांतील काही नावांच्या उच्चारात 'ॲ' आणि 'ऑ' हे दोन स्वर येतात. असे शब्द बहुधा इंग्रजीतून आले आहेत. उदा. बॅट, मॅच, ट्रॅक्टर, डॉक्टर इत्यादी. अशा शब्दांची विद्यार्थ्यांकडून यादी करून घ्यावी आणि त्या शब्दांसाठी मराठीतील प्रतिशब्द शोधून लिहिण्यास सांगावे. काही शब्दांना मराठीत प्रतिशब्द नसतील, तर नवीन शब्द योजण्यासाठी शिक्षकांनी विद्यार्थ्यांना मदत करावी. (९.३.१)



# १३. लेखन कसे असावे !

वाटोळें सरळें मोकळें । वोतलें मसीचें काळें ॥
कुळकुळीत वोळी चालिल्या ढाळे । मुक्तमाळा जैशा ॥
अक्षरमात्र तितुकें नीट । नेमस्त पैस काने नीट ।
आडव्या मात्रा त्याही नीट । आर्कुली वेलांट्या ॥
पहिले अक्षर जे काढिलें । ग्रंथ संपेतो पाहात गेलें ।
येका टांकेंचि लिहिले । ऐसे वाटे ॥
अक्षरांचे काळेपण । टांकाचें ठोंसरपण ।
तैसेंचि वळण वांकण । सारिखेंची ॥
वोळीस वोळी लागेना । आर्कुली मात्रा भेदीना ।
खालिले वोळीस स्पर्शेना । अथवा लंबाक्षर ॥
ज्याचे वय आहे नूतन । त्यानें ल्याहावें जपोन ।
जनासी पडे मोहन । ऐसें करावें ।
भोंवतें स्थळ सोडून घ्यावे । मध्येंचि चमचमित ल्याहावें ।
कागद झडतांहि झडावें नलगेचि अक्षर ॥




- संत रामदास

सूचना : वरील लेखन सुमारे ३०० वर्षांपूर्वीचे आहे. जुन्या काळातील लेखन आणि आताचे लेखन यांतील फरक मुलांच्या लक्षात आणून द्यावा. जुन्या काळातील लेखनाची वैशिष्ट्ये लक्षात यावीत; म्हणून नवीन लेखन नियमाप्रमाणे त्यात आपण दुरुस्ती करत नाही, याचीही कल्पना मुलांना द्यावी.

**मसी** - शाई
**ढाळ** - (अक्षरांचा) आकार, घाट
**नेमस्त** - नियमित
**वोळी** - ओळी
**मुक्तमाळा** - मोत्यांच्या माळा
**पैस** - जागा

१.३.१, २.३.२, ३.३.३, ४.३.१, ५.३.१, ५.३.२, ६.३.१, ९.३.१

आर्कुली - 'रेफ', उकार वगैरे | येका टांकेंचि - एकसारखे
ऐसे - असे | वांकण - वळण

भेदणे - छेदणे

**कागद झडतांहि झडावें नलगेचि अक्षर** - पाने जीर्ण होऊन फाटायला आली, तरी अक्षरे टिकून राहावीत.

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे लिहा.** (५.३.१, ५.३.२)
  (१) ओळ मोत्यांच्या माळेप्रमाणे केव्हा दिसेल ?
  (२) कवीने 'जपून लिहावे' असे कोणाला उद्देशून म्हटले आहे ?

- **खालील शब्दांबद्दल कवितेत आलेले शब्द लिहा.** (६.३.१)
  (१) ओतले ....................
  (२) असे ....................
  (३) लिहावे ....................
  (४) फाटणे ....................

**कवितेत सुचवल्याप्रमाणे लिहिलेल्या परिच्छेदांचा संग्रह करा. तो मुलांना वाचायला द्या.** (३.३.३)

- **कवितेत सांगितल्याप्रमाणे दररोज पाच ओळी घरी लिहा व गुरुजींना दाखवा.** (४.३.१)

- **खालील शब्द काळजीपूर्वक वाचा. लिहा.** (४.३.१, ९.३.१)
  अक्षर, मात्रा, ग्रंथ, स्थळ, वेलांटी.



# १४. डोंगरदादा

डोंगरदादा फारच दुःखी होता. एकटेपणामुळे कष्टी होता. तो सारखा विचार करायचा, काय करावे ? आपल्याला कुणाची सोबत नाही. संगत नाही. कोणी नाही बोलायला, कोणी नाही हसायला, कोणी नाही खेळायला.

एकदा एक नवलाची गोष्ट घडली. एक छोटेसे रोपटे डोंगरदादाच्या कुशीतून हळूच वर आले. डोंगरदादापाशी उभे राहिले. टकमक टकमक पाहायला लागले. डोंगरदादाला जरा घाबरलेच, पण धीर करून डोंगरदादाला त्याने विचारले, ''डोंगरदादा, डोंगरदादा, राहू का मी इथं ? मला देशील का तू आसरा ?''

डोंगरदादाला खूप आनंद झाला. तो म्हणाला, ''वा ! वा ! राहा की खुशाल. तुझं इथं स्वागतच आहे.''



१.३.१, ३.३.३, ४.३.१, ५.३.१, ५.३.२, ६.३.१, ९.३.१

रोपटे डोंगरदादाच्या मांडीवर जाऊन बसले. डोंगरदादाने त्याला खाऊपिऊ घातले. रोपट्याचे मोठे झाड झाले. मग दुसरी रोपटी आली. तीही डोंगरदादाने वाढवली. डोंगरदादाकडे आता खूप झाडे झाली.

काही दिवसांनी धिटुकल्या वेली आल्या. झाडांच्या भोवताली जमल्या. हातात हात धरून फेर धरू लागल्या. मग काही बुटकी झुडपे आली. माना डोलावत उभी राहिली. त्यांच्यासोबत होते इवले इवले गवत. फारच होते लाजत. ते हळूच बिलगले डोंगरदादाला. गवताचा मऊ स्पर्श झाला, डोंगरदादाला गुदगुल्या झाल्या.

काही दिवसांनी डोंगरदादा झाडाझुडपांनी भरला. गवतवेलींनी सजला. रंगीबेरंगी फुलांनी नटला. खूपच शोभून दिसू लागला.

डोंगरदादाचे जंगल झाले दाट, मग काय विचारता त्याचा थाट !

डोंगरदादाचे जंगल सिंहाच्या दृष्टीस पडले. तो डोंगरदादाकडे आला. आयाळ झुलवू लागला. डोंगरदादाच्या कुशीत होती झाडेझुडपे गाढ झोपलेली. सिंहाने गर्जना केली, तेव्हा झाडे, झुडपे, वेली, फुले थरथरली. खडबडून जागी झाली.

डोंगरदादाने सिंहाकडे पाहिले. त्याला विचारले, ''काय झालं रे बाबा ? एवढ्या मोठ्याने असा का ओरडतोस ?''

सिंह म्हणाला, ''डोंगरदादा, क्षमा करा. पाहिलं तुमचं रान आणि हरपलं माझं भान; म्हणून केली मी गर्जना. इथं दाट झाडी आहे. हवा कशी थंड आहे. राहू का मी इथं ?''

डोंगरदादा म्हणाला, ''हो, हो, अगदी आनंदानं. ही पाहा ऐसपैस गुहा. यात तू खुशाल राहा.''

सिंह खूश झाला. तो गुहेत राहायला लागला. जंगलात रुबाबात फिरायला लागला.



डोंगरदादाचे जंगल पाहून अनेक पशू यायला लागले. डुलत डुलत आली वाघोबाची स्वारी. सोंड हालवत आला हत्ती. मान वळवत जिराफ आला. शेपूट उभारत कोल्हा आला. डोळे मिचकावत अस्वल आले. पळत पळत लांडगे आले. सुंदर सुंदर हरणे आली, तुरुतुरु धावायला लागली. गोजिरवाणे ससे आले, टुणटुण उड्या मारायला लागले. वाकुल्या दाखवत माकडे आली, फांद्यांवर झोके घेऊ लागली.



डोंगरदादाने सगळ्यांना आसरा दिला. सगळ्या प्राण्यांचा गलबला सुरू झाला. डोंगरदादाला आनंद झाला.

डोंगरदादाने सगळ्या प्राण्यांना बजावले –

भांडणतंटा करू नका
दंगामस्ती करू नका
हिरव्यागार जंगलात
सगळे राहा आनंदात

हळूहळू जंगलातील झाडे फळाफुलांनी बहरली. त्यांचा घमघमाट सगळीकडे पसरला. दूरदूरच्या पक्ष्यांपर्यंत पोचला. सारे पक्षी वेगाने आले, घिरट्या घालायला लागले. घरटी बांधून आनंदाने राहू लागले. पक्ष्यांची झुंबड उडाली. त्यांची किलबिल सुरू झाली.

पशुपक्ष्यांना कळून आले – झाडे आपल्या उपयोगी पडतात, गोड फळे खायला देतात, गार जागा राहायला देतात. त्यांनी झाडांची फळे खाल्ली. त्यांच्या बिया दुसरीकडे नेल्या. तिकडच्या मातीत त्या रुजल्या. आणखी झाडे तयार झाली. आनंदाने डोलू लागली.

डोंगरदादाचा एकटेपणा संपला. तो अगदी आनंदून गेला.

मग काय झाले, डोंगरदादाजवळ ढग आले. डोंगरदादाने त्यांना जवळ घेतले. अंगाखांद्यावर आंजारले, गोंजारले, खेळवले. ढगांना खूप आनंद झाला. त्यांच्यातून पाऊस पडायला लागला. ढग गडगडले आनंदाने, झाडे भिजली पावसाने. पाऊस पडला धो धो धो, जंगल हसले खो खो खो. डोंगरदादा गाऊ लागला, जंगलाने मग ताल धरला.

या पक्ष्यांनो या सगळे
खुशाल खा या गोड फळे
मधुर मध हा फुलांतला
तुमच्यासाठी साठवला
पाऊस भरपूर पडायला
जंगल हवे राखायला

लेखक - श. त्र्यं. पाटील

झुंबड उडणे - गर्दी होणे राखणे - रक्षण करणे

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे लिहा.** (५.३.१, ५.३.२)

  (१) डोंगरदादा का दुःखी होता ?

  (२) सिंहाला डोंगरदादाकडे का राहावेसे वाटले ?

  (३) पशुपक्ष्यांमुळे आणखी झाडे कशी तयार झाली ?

  (४) डोंगरदादाचा एकटेपणा केव्हा संपला ?

  (५) डोंगरदादाने सगळ्या प्राण्यांना काय सांगितले ?

- **कोण ते सांगा. लिहा.** (५.३.१)

  (१) तुरुतुरु धावायला लागली

  ........................................

  (२) फांद्यांवर झोके घेऊ लागली

  ........................................

  (३) हातात हात धरून फेर धरू लागल्या

  ........................................

  (४) डोंगरदादाच्या मांडीवर बसले

  ........................................

  (५) डोंगरदादाच्या कुशीत गाढ झोपलेली

  ........................................

  (६) डोळे मिचकावत आला

  ........................................

- **जोड्या जुळवा.** (६.३.१)

| | |
|---|---|
| धिटुकल्या | रोपटे |
| गोजिरवाणे | हरणे |
| सुंदर | ससे |
| ऐसपैस | गुहा |
| बुटकी | वेली |
| छोटेसे | झुडपे |

- **कोण, कोणास म्हणाले. ते सांगा.** (५.३.१)

(१) "डोंगरदादा, डोंगरदादा, राहू का मी इथं ?"

(२) "वा ! वा ! राहा की खुशाल."

(३) "काय झालं रे बाबा ? एवढ्या मोठ्याने असा का ओरडतोस ?"

(४) "पाहिलं तुमचं रान आणि हरपलं माझं भान."

(५) "हो, हो, अगदी आनंदानं."

- **'डुलत डुलत' आणि 'हळूहळू' यासारखे पाठातील शब्द शोधा आणि लिहा.** (६.३.१)

.................................... ....................................

.................................... ....................................

.................................... ....................................

- **खालील शब्द काळजीपूर्वक वाचा. लिहा.** (४.३.१, ९.३.१)

संगत, झुडूप, गर्जना, झुंबड, किलबिल.

# १५. शाबास माझ्या पुता !

जितूचे बाबा आणि त्यांचे मित्र मोठी नाव घेऊन मासे पकडायला समुद्रात दूरवर जात असत आणि दोन दिवसांनी परत येत असत. ते आले, की जितूला त्यांच्याबरोबर खूप काम करावे लागत असे. त्यांनी आणलेले मासे जाळ्यातून बाहेर काढणे, टोपलीत भरणे, मोजणे आणि मग मासे विकायला आईबरोबर बाजारात जाणे. बाबांबरोबर काम करायला, आईबरोबर बाजारात जायला जितूला खूप आवडायचे. जितू पटापट मासे मोजायचा, तेव्हा बाबा अंगणात बसून जितूकडे कौतुकाने पाहात राहायचे.



१.३.३, २.३.२, ३.३.३, ४.३.१, ४.३.३, ५.३.१, ५.३.२, ६.३.१, ९.३.१

आज मात्र जितूला काम नव्हते. त्याने आणि त्याच्या मित्रांनी समुद्रावरच सगळा दिवस घालवायचा, खूप मजा करायची असे ठरवले होते. जितूच्या आईने शिदोरी तयार करून दिली.

जितू आपली शिदोरी घेऊन समुद्रावर आला तेव्हा सकाळची वेळ होती. गार गार वारा अंगाला लागत होता. जितू अगदी आनंदात होता. अजून कोणी मित्र आले नव्हते. तो समुद्राच्या लाटांकडे अन् त्यांच्या फेसाकडे पाहत होता. कितीही दूरवर पाहिले, तरी समुद्र आपला आहेच आहे. पाणीच पाणी ! अगदी क्षितिजापर्यंत !

जितू वाळूत बसला. बसल्या ठिकाणीच पिशवीतील एकेक शंख आपल्या भोवताली वाळूत तो मांडू लागला. छोटे-मोठे, लाल, काळे, टोकदार, रंगीत असे खूप शंख जितूकडे होते. वेगवेगळे आणि रंगीबेरंगी शिंपलेसुद्धा. जितूचा हा खजिना त्याचा अगदी जीव की प्राण होता. सुंदर सुंदर शंखशिंपले गोळा करणे हा जितूचा छंदच. जरा वेळ मिळाला, की तो लगेच समुद्रावर जायचा आणि वाळूतले शंखशिंपले गोळा करायचा. त्याच्या सगळ्या मित्रांपेक्षा त्याच्याकडे जास्त शंखशिंपले होते.

हळूहळू त्याचे सगळे मित्र आले. मन्नूही आला होता आणि मग गप्पागोष्टींना खूपच रंगत चढली. वाळूचे किल्ले करता करता किती वेळ गेला ते त्यांना कळलेसुद्धा नाही.

अचानक सगळ्यांनी भोंग्याचा आवाज ऐकला. ती वादळाची सूचना होती. जितूचे बाबा आपल्या साथीदारांबरोबर मासे पकडायला गेलेले होते. त्यांना जाऊन तासभर होऊन गेला होता. आता काय करावे ? त्यांना परत कसे बोलवावे ? सगळ्या बायका, म्हातारे लोक किनाऱ्यावर जमले. सर्वजण काळजीत पडले. सगळे लोक ओरडून ओरडून समुद्रावर गेलेल्या कोळ्यांना हातवारे करून बोलावू लागले.

'वादळात आपले बाबा सापडणार' या भीतीने जितू बेचैन झाला. काय करावे हे त्याला सुचेना. 'कोणता तरी धोक्याचा लाल बावटा त्यांना दिसायला हवा, म्हणजे ते नावा परत फिरवतील', असा विचार त्याच्या मनात आला. त्याला एक कल्पना सुचली. तो धावत धावत घरी गेला. आईची लाल साडी घेऊन पळत आला. किनाऱ्यावरच्या छोट्या डोंगीत त्याने उडी मारली. डोंगीवरच्या लांब बांबूला ती साडी बांधली. तो बांबू उंच उभा केला. मन्नूनेही डोंगीत उडी मारली आणि ती डोंगी समुद्रात लोटली. वल्हे जोरजोराने मारत ते समुद्रात निघाले.



समुद्रात दूरवर गेलेल्या नावांवरच्या कोळ्यांनी जितूच्या डोंगीवरचा हा धोक्याचा इशारा पाहिला आणि नावा परत फिरवल्या. जितू आणि मन्नूनेही आपली डोंगी किनाऱ्याच्या दिशेने परत फिरवली. आता वारा खूपच वेगाने वाहू लागला होता. समुद्राच्या लाटा अधिकच वेगाने येऊ लागल्या. समुद्र खवळला होता. त्या मोठमोठ्या लाटांमधून डोंगी वल्हवणे कठीण जात होते. मन्नूचे आणि जितूचे हात दुखून आले. शेवटी ते कसेबसे किनाऱ्यावर पोचले, तेव्हा लोकांनी पुढे येऊन त्यांची डोंगी नांगराला बांधली.

जितू या श्रमाने अर्धवट बेशुद्ध झाला होता.



जितू शुद्धीवर आला, तेव्हा त्याचे बाबा त्याला प्रेमाने कुरवाळून डोळ्यांत पाणी आणून म्हणाले, ''शाबास माझ्या पुता !''

क्षितिज - आकाश जिथे जमिनीला खाली टेकल्याचा भास होतो
डोंगी - छोटी नाव इशारा - सूचना पुता - मुला

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे लिहा.** (५.३.१, ५.३.२)
  (१) जितूला कोणती कामे करावी लागत असत ?
  (२) जितूच्या खजिन्यात काय काय होते ?
  (३) भोंग्याच्या आवाजाने कशाची सूचना दिली ?
  (४) जितूने त्याच्या वडिलांना धोक्याची सूचना देण्यासाठी काय केले ?

- **वाक्यांत उपयोग करा.** (६.३.१)
  पटापट मोजणे, दूरवर पाहणे, बेशुद्ध होणे.

- **पाण्यातून जाण्यासाठी कोणकोणती साधने वापरतात त्याची नावे सांगा. लिहा. (पहिले अक्षर दिले आहे.)** (४.३.३)
  हो............ डों............ ना............ ज............

- **पाठात 'गप्पागोष्टी', 'शंखशिंपले' हे शब्द आले आहेत. यांसारखे शब्द आठवून लिहा.** (६.३.१)
  ........................ ........................
  ........................ ........................
  ........................ ........................

- **खालील शब्द काळजीपूर्वक वाचा. लिहा.** (४.३.१, ९.३.१)
  समुद्र, क्षितिज, कौतुक, परंतु, बेशुद्ध.

# १६. चालता चालता काय होते



समोर समोर चालता चालता
शेवटी संपून जाईल रस्ता,
आकाश राहील उभे पुढ्यात,
चांदोबाला लागेल हात.
असे काही मनात धरून
चालत सुटतो रस्त्यावरून.



गळ्यात गलोल, हातात छडी,
खिशात शेंगदाण्याची पुडी.
चालता चालता काय होते,
रेल्वे फाटक आडवे येते.
गाडीला मग 'टाटा' करतो
समोर समोर चालत राहतो.



चालता चालता काय होते,
एक छोटे तळे लागते.
पाय बुडवून, भाकऱ्या खेळून
दाणे खात चालतो फिरून.



पुढे एकदम आले समोर
चिंचेचे वन हिरवेगार !
गलोल मारून चिंचा पाडतो,
चोखत चोखत दुडका पळतो.

१.३.१, २.३.२, २.३.३, ३.३.३, ४.३.१, ५.३.१, ५.३.२, ६.३.१, ७.३.१, ९.३.१

मग पुढे काय झाले,
ओसाड माळ, डोंगर आले.
सगळीकडे सामसूम
कडक ऊन घामाघूम.
बसून राहिलो दगडावर
एकटा एकटा... दूर घर...



'आई आई' ओरडू वाटले,
दाटून दाटून रडायला आले.
खाड् खाड् बूट वाजले
उंचच उंच कोण आले ?

आरपार घाबरून गेलो,
अंथरुणात मी उठून बसलो.

कवयित्री - इंदिरा संत

**पुढ्यात** - एकदम समोर **फिरून** - पुन्हा
**दुडका** - जवळ जवळ आणि भरभर पावले पडतील अशाप्रकारे
**सामसूम** - शांत
**भाकऱ्या खेळणे** - पाण्यात दगड फेकून वलय निर्माण करण्याचा खेळ खेळणे.

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे लिहा.** (५.३.१, ५.३.२)

(१) पुढे पुढे चालत राहिल्यावर काय होईल असे मुलाला वाटते ?
(२) निघताना मुलाने आपल्याबरोबर घेतलेल्या तीन गोष्टी कोणत्या ?

(३) मुलगा दगडावर का बसून राहिला ?
(४) आपण स्वप्नात होतो हे मुलाला केव्हा कळले ?

- **खालील प्रसंगी मुलाने काय केले ते सांगा.** (५.३.१)

(१) चालता चालता रेल्वे फाटक आडवे आले.
(२) वाटेत एक छोटे तळे लागले.
(३) चिंचेचे हिरवेगार वन समोर आले.

- **खालील गोष्टी खरोखर घडल्या की स्वप्नात घडल्या ते सांगा.** (५.३.१)

(१) मुलगा दगडावर बसून राहिला.
(२) मुलगा एकटा व घरापासून दूर होता.
(३) मुलगा अंथरुणात उठून बसला.
(४) खाड्खाड् बूट वाजवत कुणीतरी उंच माणूस आला.

- **खालील शब्दसमूहांचा वाक्यात उपयोग करा.** (६.३.१)

आडवे येणे, सामसूम होणे, घामाघूम होणे.

- **चित्रे काढा. त्यासमोर कवितेच्या योग्य ओळी लिहा.** (७.३.१)

(१) गळ्यात गलोल, हातात छडी घेऊन चालणारा मुलगा.
(२) रेल्वेच्या फाटकाआडून गाडीला 'टाटा' करणारा मुलगा.
(३) पाण्यात पाय बुडवून भाकऱ्या खेळणारा मुलगा.

- **'उंचच उंच' यासारखे आणखी काही शब्द तयार करा. लिहा.** (९.३.१)

- **खालील शब्द काळजीपूर्वक वाचा. लिहा.** (४.३.१, ९.३.१)

गलोल, दूर, खिसा, रस्ता.

□□□

# १७. फुलांची भेट

एक गाव होते. तिथे पुष्कळ घरे होती. काही घरांभोवती फुलांची-फळांची झाडे होती. वाऱ्याच्या झुळकीने गार वाटायचे. झाडावरच्या फुलांचा वास सगळीकडे दरवळायचा. अशा एका घरात राधामावशी राहत होत्या. एकट्याच होत्या त्या. सारख्या या ना त्या कामात मग्न असायच्या. बागेत काम करायची त्यांना खूप हौस होती. कुणी विचारले तर म्हणायच्या, 'ही झाडं हेच माझे मित्र. त्यांना लहानाचं मोठं करणं, त्यांच्याशी गप्पा मारणं यात वेळ कसा जातो समजतच नाही.' त्यांच्या बागेत खूप प्रकारची फुलझाडे होती. येणारा जाणारा प्रत्येकजण बागेजवळ क्षणभर थांबायचा. फुलांकडे बघत राहायचा, आनंदित व्हायचा. ते पाहून राधामावशींना खूप बरे वाटायचे.



१.३.१, ३.३.३, ४.३.१, ४.३.३, ५.३.१, ६.३.१, ९.३.१

जवळच शाळा होती. शाळेत जाणाऱ्या मुली बागेशी थांबायच्या नि म्हणायच्या, 'किती सुंदर फुलं आहेत ग ! मला तर वाटतं, तोडावी नि डोक्यात घालावी.' एक दिवस मुलींनी हे धाडस केले. फुले घेऊन मुली निघून गेल्या. राधामावशी बागेत येऊन बघतात तो काय, वेलीवर फुले नाहीत. कोणी बरे तोडली असावीत फुले ?



दुसऱ्या दिवशी कोणी बघत नाहीसे पाहून मुली बागेत शिरल्या. तो त्यांना काय दिसले ? काल ज्या वेलीवरून फुले तोडली होती ती वेल अगदी लहान झाली होती. "अय्या ! वेल कशी तुटली ? का बरं तोडली कोणी ? किती सुंदर फुलं यायची तिला !"

मुलींची कुजबूज राधामावशींनी ऐकली. घरातून त्या बाहेर आल्या. त्यांना बघून मुली पळून जाऊ लागल्या. राधामावशी त्यांना म्हणाल्या,

"अगं, अशा पळून जाऊ नका ! तुम्ही तोडलीत ना फुलं... का तोडलीत विचारल्याशिवाय ?"

''मावशी, किती सुंदर फुलं आहेत हो ! आम्ही शाळेत जाताना बघतो ना, तेव्हा वाटतं गजरे करावे आणि...''

''अगं, मुलीच तुम्ही. वाटायचंच डोक्यात गजरे घालावे असं... आणि मुलांनाही फुलं आवडतातच की ! फुलं तोडायला वेळ लागत नाही; पण वेली, झाडं लावायला, ती मोठी व्हायला वेळ लागतो.''

''पुन्हा नाही असं करणार.''

''एवढ्यानं नाही भागायचं. आज मी तुम्हांला काम सांगणार आहे.'' आता मात्र मुली चांगल्याच घाबरल्या. घरात निघून गेलेल्या राधामावशी हातात वेलीच्य छोट्या छोट्या फांद्या घेऊन आल्या.

''वेली छाटायलाच आल्या होत्या. आज मी तुम्हांला वेलीच्या फांद्या देणार आहे. त्या तुम्ही आपापल्या घरी नेऊन लावायच्या. रोज पाणी घालायचं, काळजी घ्यायची. वेलींवर सुंदर फुलं येतील. फुलं झाडावरच छान दिसतात आणि खूप वेळ ताजीदेखील राहतात. कधी वाटलंच तर थोडी तोडायची नि गजरे घालून मला दाखवायला यायचं.''

मुली शांत झाल्या. मनातून खजील झाल्या. फांद्या हातात घेऊन त्या घरी गेल्या. आपापल्या घरी त्यांनी फांद्या लावल्या.

जसे दिवस जाऊ लागले, तसे जमिनीत लावलेल्या फांद्यांना हिरवे धुमारे दिसू लागले. चिमुकल्या कळ्या फांद्यांवर डोलायला लागल्या.

एक दिवस सगळ्या मुलींनी ठरवले, की आपण राधामावशींकडे जायचे. त्यांना एक लहानशी भेट द्यायची.

सकाळी सकाळी मुलींचा घोळका दारात आलेला पाहून राधामावशींना आनंद झाला.

''काय ग मुलींनो ? कुठे होतात इतके दिवस ? रागावलात, की विसरलात मावशीला ?''

''नाही हो मावशी. विसरू कशा आम्ही तुम्हांला ? आम्ही आज तुमच्यासाठी एक भेट आणली आहे. ही फुलं की नाही आम्ही तुमच्यासाठी आणलीत. तुम्ही वेलीच्या फांद्या छाटून आम्हांला दिल्या होत्या ना, त्या आम्ही घरी लावल्या. त्यांचीच ही फुलं आहेत.''



## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे लिहा.** (५.३.१)

  (१) राधामावशी झाडांविषयी काय म्हणत ?

  (२) राधामावशींनी मुलींना वेलीच्या फांद्या देऊन काय सांगितले ?

  (३) मुलींनी राधामावशींना कोणती भेट दिली ?

- **कोण, कोणास म्हणाले ते सांगा. लिहा.** (५.३.१)

(१) ''किती सुंदर फुलं आहेत ग ! मला तर वाटतं, तोडावी नि डोक्यात घालावी.''

........................................................................................

(२) ''आज मी तुम्हांला काम सांगणार आहे.''

........................................................................................

(३) ''आम्ही आज तुमच्यासाठी एक भेट आणली आहे.''

........................................................................................

- **राधामावशींनी दिलेल्या फांद्यांचे वेलींमध्ये रूपांतर झाले, त्याचे वर्णन थोडक्यात लिहा.** (४.३.३)

- **'घोळका - मुलींचा' याप्रमाणे खालील समूह कोणाचा ते लिहा.** (६.३.१)

कळप – ..................

गर्दी – ..................

ताटवा – ..................

मोळी – ..................

थवा – ..................

- **खालील शब्द काळजीपूर्वक वाचा. लिहा.** (४.३.१, ९.३.१)

झुळूक, कुजबूज, खजील, आनंदित.

# १८. राजू आरशात पाहतो

माझी मुलगी एक वर्षाची होती. एक दिवस मी तिच्यासमोर आरसा धरला. स्वत:च्या प्रतिबिंबाकडे ती पाहतच राहिली. तिला कडेवर घेऊन आरशासमोर नेले. दोघांची प्रतिबिंबे पाहून ती हसू लागली, आनंदित झाली.

ते पाहून माझ्या मनात आले, की जंगलातले प्राणी पाण्यात आपले प्रतिबिंब बघत असतील. त्यांना त्याबद्दल काय वाटत असेल ? त्यांना जर आपण आरसा दाखवला, तर काय होईल ? काय करतील बरे ते ? घरी पाळलेल्या प्राण्यांपैकी आरशात बघून कोण कसे वागेल, याची खरोखरच मला खूप उत्सुकता लागली.

आरसा घेऊन मी घरी पाळलेल्या माकडांकडे गेलो. राजू आणि बबली ही दोन्ही माकडे त्यांच्या उंच ठेवलेल्या खोक्यावरून माझ्याकडे बघत होती. मी जवळ गेलो आणि एकदम आरसा राजूच्या समोर धरला. मानेवरचे केस फुगवून दात विचकत त्याने आरशात



१.३.१, ३.३.३, २.३.३, ४.३.१ ४.३.३, ५.३.१, ५.३.२, ६.३.१, ९.३.१

पाहिले. आरशातील माकड दात विचकत आहे, हे पाहिल्यावर तो चांगलाच घाबरला आणि बबलीच्या अंगावर ओरडत धावला.

बबली आरशाकडे येऊ लागली. तिला राजूने मागे ओढले. मग परत हळूच वळून आरशात पाहू लागला. स्वत:ला बघून तो झटकन दुसरीकडे बघत होता; पण आरशात पाहण्याचा मोह टाळू शकत नव्हता.



आरशात जरी दुसरे माकड असले, तरी ते चाल करून पुढे येत नाही हे पाहिल्यावर राजू थोडा धीट झाला. आरशात (स्वत:ला) चांगले निरखून पाहू लागला. लांबून विचित्र आवाज काढला, तरी आरशातले माकड काहीच आवाज करत नाही, हे समजल्यावर तो बुचकळ्यात पडला.

राजूने स्वत:ची पाठ खाजवली, मान खाजवली. आरशाकडे पाहायचे नाही असे ठरवून बसला. बबली पुढे आली. बबलीमुळे त्याला धीर आला असावा. मागचा पाय लांब करून तो आरशाकडे नेऊ लागला. आरशातून एक पाय येताना पाहून झटक्यात त्याने पाय मागे घेतला. पुन्हा पाय मागे करत करत त्याने शेवटी एकदा पाय आरशाला लावला. पाय कोणी धरत नाही व काही चावत नाही हे त्याला कळले.



त्याने तोंड जवळ नेऊन आरशाचा वास घेतला, आरसा चाटला, दात विचकले. आपल्याला या वस्तूपासून धोका नाही अशी त्याची खात्री झाली. मग त्याने आरसा हातात घेतला. दोन्ही हातांनी धरून दूर केला, परत जवळ आणला. समोर धरला. स्वत:ला पाहत एका हाताने आरशाच्या मागे कोणी आहे का, म्हणून चाचपून पाहिले. शेवटी आरसा उलटा करून मागे कोणी नाही याची त्याने खात्री करून घेतली. राजू माकडाच्या या सर्व कृतींचे मला खरोखरच नवल वाटत होते.

लेखक - विलास मनोहर

**नवल** - आश्चर्य

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे लिहा.** (५.३.१, ५.३.२)
  (१) मुलीसमोर आरसा धरला तेव्हा तिने काय केले ?
  (२) आरसा समोर धरल्यावर प्रथम राजूने कोणती कृती केली ?
  (३) बबली आरशाकडे जाऊ लागताच राजूने काय केले ?
  (४) आरसा हातात धरून राजूने सर्वांत शेवटी कोणत्या गोष्टीची खात्री करून घेतली ?

- **खिडकीतून किंवा दारातून उन्हाची तिरीप आत येते. तिथे छोटा आरसा धरून वेगवेगळ्या प्रकारे हालवा. काय दिसले ते दोन-तीन वाक्यांत लिहा.** (४.३.३)

- **तुम्ही स्वत: आरशासमोर उभे राहा. उजवा हात हालवा. डावा पाय उचला. डाव्या हाताने डोके खाजवा. अशा विविध हालचाली करून प्रतिबिंबाचे निरीक्षण करा व पुढील प्रश्नांची उत्तरे लिहा.** (४.३.३)
  (१) तुम्ही उजवा हात उचलला, की प्रतिबिंब कोणता हात उचलते ?
  (२) तुम्ही डावा हात हालवला, की प्रतिबिंब कोणता हात हालवते ?

- **खालील शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.** (६.३.१)
  बुचकळ्यात पडणे, उत्सुकता वाटणे, धीर येणे, चाल करून येणे, चाचपून पाहणे.

- **खालील शब्दांच्या विरुद्ध अर्थाचे शब्द पाठात आहेत ते शोधा व पाटीवर लिहा.** (६.३.१)
  घाबरट, सुरुवात, सुलटा, समोर.

- **तुम्ही पाळलेल्या मांजरीला/कुत्र्याला आरसा दाखवा. काय होते ते बघा आणि सांगा.** (सोबत आई/बाबा/गुरुजी असू द्या.) (२.३.३)

- **खालील शब्द काळजीपूर्वक वाचा. लिहा.** (४.३.१, ९.३.१)
  प्रतिबिंब, उत्सुकता, विचित्र, खात्री, कृती.



## १९. मला व्हायचंय अंतराळवीर



मला व्हायचंय
अंतराळवीर
संचाराला
मी अधीर
सुसज्ज एक
अंतराळयान
त्यामधून करीन
वर उड्डाण
तारे वारे
वीज ढग
अद्‌भुतरम्य
पाहीन जग.

पहिला मुक्काम
चंद्रावर
मग स्वारी
शुक्रावर
मारुतीसारखीच
अनावर
झेप पुढे तर
-सूर्यावर

१.३.१, २.३.२, २.३.४, ३.३.३, ४.३.१, ४.३.३, ५.३.१, ५.३.२, ६.३.१, ७.३.१, ९.३.१

संकटांशी
दोन हात
जिद्दीने त्यांवर
करीन मात

नवे शोध
नवे ज्ञान
या जगाची
वाढवीन शान

मला व्हायचंय
अंतराळवीर
संचाराला
मी अधीर



कवयित्री - वृंदा लिमये

**अंतराळवीर** - अंतराळात/अवकाशात प्रवास करणारा
**संचार** - फिरणे
**अधीर** - उत्सुक
**सुसज्ज** - सर्व आवश्यक वस्तूंनी भरलेले
**उड्डाण** - मोठी उडी, झेप
**स्वारी** - मोहीम
**अनावर** - आवरता येणार नाही असे
**दोन हात करणे** - सामना करणे
**मात करणे** - विजय मिळवणे

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे लिहा.** (५.३.१)
  (१) मुलाला कोण व्हायचे आहे ?
  (२) मुलगा कोठे उड्डाण करणार आहे ?

(३) मुलगा कोणते अद्‌भुतरम्य जग पाहणार आहे ?
(४) मुलगा कोणाशी लढाई करणार आहे ?
(५) मुलाने नवे ज्ञान मिळवल्यावर व नवे शोध लावल्यावर काय होईल ?

- **कवितेतील शब्द वापरून खालील वाक्ये पूर्ण करा.** (५.३.२)

(१) .............. अशा अंतराळयानातून मी अंतराळात प्रवास करणार आहे.

(२) अंतराळात प्रवास करायला मी .................... आहे.

(३) मला .................... व्हायचंय.

(४) अंतराळयानात बसून मी अंतराळात .................... करणार आहे.

(५) माझ्या अंतराळ प्रवासातील मी पहिला .................... चंद्रावर करीन.

(६) चंद्रावर उतरून नंतर मी शुक्रावर .................... करीन.

- **खालील वाक्प्रचारांचा खाली दिलेल्या वाक्यांत योग्य प्रकारे उपयोग करून वाक्ये पूर्ण करा.** (६.३.१)

(मात करणे, दोन हात करणे, शान राखणे)

(१) जंगलात जर मला चोराने गाठले तर मी त्याच्याशी ....................

(२) आम्ही आमच्या चांगल्या वागण्याने शाळेची ....................

(३) त्याच्या घरची स्थिति फार गरिबीची होती, तरी परिस्थितीवर .................... त्याने आपले शिक्षण पूर्ण केले.

- **अंतराळवीर, अंतराळयान, सूर्यमंडळ व ग्रह यांसंबंधी शिक्षकांना प्रश्न विचारून माहिती करून घ्या.** (२.३.४)

- **अंतराळवीरांची चित्रे जमवा. संग्रह करा.** (७.३.१)

● खालील वारांच्या नावांवरून तारे व ग्रहांची नावे तयार करा. (४.३.३, ९.३.१)

| आठवड्यातील वार | ग्रह / तारे |
|---|---|
| जसे - मंगळवार<br>बुधवार<br>गुरुवार<br>शुक्रवार<br>शनिवार<br>रविवार | मंगळ |
| राहिलेल्या ग्रहांची नावे | |

(४) तुम्ही चंद्रावर गेलात, तर तिथे तुम्ही काय कराल ते लिहा. (४.३.३)

वर्तमानपत्रांत ग्रहांसंबंधी आलेल्या माहितीची कात्रणे घ्या. संग्रह करा व तो मुलांना पाहायला द्या.

● खालील शब्द काळजीपूर्वक वाचा. लिहा. (४.३.१, ९.३.१)
सुसज्ज, उड्डाण, अद्‌भुतरम्य, मुक्काम, जिद्द.

□□□

# २०. धावपटू भाग्यश्री बिले



१९९४ सालची गोष्ट.

पुणे येथे राष्ट्रीय क्रीडास्पर्धा चालू होत्या. निरनिराळ्या स्पर्धांचे निकाल वर्तमानपत्रांतून झळकत होते. दूरदर्शनवरून तर बातम्या देता देता विजयी स्पर्धकांचे दर्शनही घडवले जात असे.

एके दिवशी अशीच एक बातमी आकाशवाणीवरून कानीं पडली — '१०,००० मी. धावण्याच्या शर्यतीमध्ये भाग्यश्री बिले ही सुवर्णपदकाची मानकरी ठरली आहे. याच स्पर्धेत तिने आंतरराष्ट्रीय विक्रमाची नोंद केली. ३००० आणि १५०० मीटर स्पर्धेतही भाग्यश्रीने उत्तम कामगिरी केली आहे. त्या स्पर्धांतही तिने रौप्य आणि कांस्यपदक मिळवलं आहे; त्यामुळे तिचं सर्वत्र कौतुक होत आहे.' दूरदर्शनवरून आणि वर्तमानपत्रांमधून भाग्यश्रीच्या यशाची ही बातमी सर्वत्र जाऊन पोचली. काहींनी भाग्यश्रीला भेटून तिचे

१.३.१, ३.३.३, ४.३.१, ४.३.३, ५.३.१, ५.३.२, ६.३.१, ९.३.१



अभिनंदन केले. काहींनी पत्रांतून तिला शाबासकी दिली. कोणी समारंभ घडवून आणून भाग्यश्रीच्या कामगिरीचा गौरव केला. आपण घेतलेल्या श्रमांचे चीज झाले, असे भाग्यश्रीला वाटले.

भाग्यश्री बिले ही एका सामान्य शेतकरी कुटुंबात जन्माला आलेली मुलगी. दीड-दोनशे घरे असलेल्या सोलापूर जिल्ह्यातील खोमनाळ या लहानशा गावी जन्मली. घरची स्थिती फारशी समाधानकारक नव्हती. वडील फक्त तीन इयत्तांपर्यंतचे शिक्षण घेतलेले. त्यांनी खोमनाळच्या शाळेत भाग्यश्रीचे नाव घातले. भाग्यश्री शिकू लागली. खोमनाळची शाळा चार इयत्तांपर्यंतचीच होती. पुढील शिक्षणाची सोय मंगळवेढ्याला होती. खोमनाळ व मंगळवेढ्यामधील (तालुका) अंतर सुमारे साडेसहा ते सात किमी. होते. भाग्यश्री मंगळवेढ्यातील 'इंग्लिश स्कूल'मध्ये शिकू लागली. शाळेची वेळ गाठण्यासाठी तिला रोज धावत्र-पळत जावे लागे. यातूनच तिचा धावण्याचा चांगला सराव झाला.

भाग्यश्रीची शिक्षणातील प्रगती चांगल्यापैकी होती. अभ्यासात ती मागे नव्हती, पण तिला खेळांची विशेष आवड होती. शाळेतील निरनिराळ्या खेळांत ती आनंदाने भाग घ्यायची, मनापासून खेळायची. शाळेत खेळांच्या स्पर्धा व्हायच्या. त्यांत भाग्यश्री नेहमीच पहिला क्रमांक मिळवायची, बक्षिसे मिळवायची. शाळेतील गुरुजींना, बाईंना खूप आनंद व्हायचा. कधी कधी खेळांच्या स्पर्धा बाहेरगावी असायच्या. वडील भाग्यश्रीला खेळासाठी बाहेरगावी जाण्याची परवानगी द्यायला राजी नसायचे. त्यामुळे भाग्यश्रीला अशा मोठ्या स्पर्धांमध्ये भाग घेता येत नसे. तिला खूप वाईट वाटायचे, ती खिन्न व्हायची.

एकदा बाहेरगावी अशीच एक धावण्याची स्पर्धा होती. त्या महत्त्वाच्या स्पर्धेसाठी शाळेने भाग्यश्रीला पाठवायचे ठरवले. भाग्यश्रीला खूप आनंद झाला. त्या स्पर्धेत भाग घेण्याचे तिने ठरवले, पण वडिलांच्या परवानगीचे काय ? वडिलांच्या परवानगीखेरीज शाळा आपल्याला स्पर्धेसाठी बाहेरगावी पाठवणार नाही, हे भाग्यश्रीने ओळखले. काय करावे हे तिला सुचेना.

भाग्यश्रीने खूप विचार केला. या कामी तिने काकांची मदत घेण्याचे ठरवले. काका आपल्याला वडिलांची परवानगी मिळवून देतील याची तिला खात्री होती. भाग्यश्री काकांकडे गेली. काकांना तिने आपली अडचण सांगितली. काकांना भाग्यश्रीचे म्हणणे पटले. काका आणि गुरुजींच्या मध्यस्थीमुळे नाइलाजाने का होईना पण एकदाची वडिलांनी परवानगी दिली. काकांना, गुरुजींना बरे वाटले. भाग्यश्री तर आनंदूनच गेली.

भाग्यश्रीने त्या धावण्याच्या स्पर्धेत भाग घेतला. सारी शक्ती एकवटून भाग्यश्री धावली आणि तिने पहिला क्रमांक पटकावला. लोकांनी, विद्यार्थ्यांनी, शिक्षकांनी टाळ्यांचा गजर केला. भाग्यश्रीला




इ. ८ वीत असताना धावण्याच्या स्पर्धेत प्रथम क्रमांक मिळवला.

बक्षीस मिळाले. शाळेचे नाव झाले. गावाचा मान राखला गेला. वडील अभिमानाने आणि आनंदाने ज्याला त्याला सांगू लागले, "मी परवानगी दिली. माझी मुलगी पहिल्या क्रमांकाचे बक्षीस घेऊन आली !"

इयत्ता आठवीपर्यंत भाग्यश्री सतत खेळत आणि बक्षिसे मिळवतच राहिली. मात्र नववी-दहावीच्या अभ्यासामुळे काही काळ खेळाचा व धावण्याचा सराव तिने कमी केला. त्यानंतर अकरावी-बारावीपासून तिने धावण्याचा सराव पुन्हा सुरू केला. तो सतत वाढवत नेला. उत्कृष्ट धावपटू म्हणून ती ओळखली जाऊ लागली. दिवसें-दिवस ती अधिकाधिक यश मिळवू लागली. धावण्याच्या अनेक स्पर्धांसाठी भाग्यश्रीची निवड होऊ लागली. तीही भाग घेऊन यश मिळवू लागली. 'यशश्री-भाग्यश्री' असे म्हणून तिचे सर्वत्र कौतुक होऊ लागले.

धावपटू म्हणून धावण्याचा सराव चालू ठेवण्याचा तिचा विचार आहे. ग्रामीण भागातील, पैशाचे पाठबळ आणि सोयी नसलेल्या खेळाडूंना मदत करण्याची तिची इच्छा आहे.

भाग्यश्रीने मोठ्या जिद्दीने हे सारे यश मिळवले आहे. अशीच जिद्द आपल्यातही असली पाहिजे.

**सुवर्ण** - सोने
**रौप्य** - रुपे, चांदीचा एक प्रकार
**कांस्य** - जस्त व तांबे यांचा मिश्रधातू
**राजी नसणे** - तयार नसणे

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे लिहा.** (५.३.१, ५.३.२)
  (१) भाग्यश्रीचा गौरव का करण्यात आला ?
  (२) बाहेरगावच्या स्पर्धांत भाग्यश्रीला भाग का घेता येत नसे ?
  (३) स्पर्धेसाठी बाहेरगावी जाण्याची परवानगी भाग्यश्रीला कशी मिळाली ?
  (४) भाग्यश्रीच्या शाळेचे नाव कशामुळे झाले ?
  (५) धावपटू म्हणून यशस्वी होण्यासाठी भाग्यश्रीने कोणते प्रयत्न केले ?
  (६) भाग्यश्रीच्या मनात कोणती इच्छा आहे ?
- **'केल्याने होत आहे रे' हे सुवचन भाग्यश्रीला कसे लागू पडते ते सांगा.** (५.३.१)
- **तुमच्या शाळेतील चांगल्या खेळाडूची माहिती मिळवा. ती माहिती पाच वाक्यांत लिहा.** (४.३.३)
- **खालील शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.** (६.३.१)
  दर्शन घडवणे, गौरव करणे, राजी नसणे, श्रमाचे चीज होणे.
- **पाठात 'भाग्यश्री', 'यशश्री' हे शब्द आले आहेत. यांसारखे आणखी शब्द सांगा. लिहा.** (९.३.१)
- **खालील शब्द काळजीपूर्वक वाचा. लिहा.** (४.३.१, ९.३.१)
  राष्ट्रीय, क्रीडा, स्पर्धा, बक्षीस, सुवर्ण, कांस्य, रौप्य.



# २१. तेनालीराम

संध्याकाळची वेळ होती. तेनालीराम आपल्या घरातील दिवाणखान्यात बसला होता. त्या वेळी काही माणसे गुपचूप त्याच्या घरात घुसली आणि एका खोलीत लपून बसली. तेनालीराम चाणाक्ष होता. त्याने त्या माणसांना आपल्या बागेत शिरल्यापासूनच पाहिले होते. त्यांच्या हालचालींवरून ते चोर असल्याचे त्याने ओळखले होते.

तेनालीरामाने आपल्या पत्नीला व मुलाला बोलावले आणि थोड्या मोठ्यानेच तो म्हणाला, ‘‘सध्या राजधानीत चोरांचा फार सुळसुळाट झालेला आहे. आपल्या घरावरसुद्धा त्यांची धाड पडायची एखादेवेळी, तेव्हा काळजी घेतलेली बरी. आपण आता घरातील सर्व दागदागिने आणि मूल्यवान वस्तू एकत्र करू. त्या एका भक्कम पेटीत भरू आणि ती पेटी बागेतल्या विहिरीत सोडून देऊ. नंतर ती केव्हाही वर काढता येईल.’’

शेजारच्या खोलीत लपलेले चोर हे बोलणे ऐकत असणारच हे तेनालीरामाला माहीत होते.





१.३.१, २.३.३, ३.३.३, ४.३.१, ५.३.१, ५.३.२, ६.३.१, ९.३.१

नंतर तिघांनी घरातील सर्व खोल्यांत जाऊन, मूल्यवान वस्तू, दागिने, भारी कपडे एकत्र केले आणि दिवाणखान्यात सुरक्षित जागी ते ठेवून दिले. त्यानंतर त्यांनी एक मोठी व भक्कम अशी लोखंडी पेटी आणली. तिच्यात दगडविटांचे तुकडे व माती भरली



आणि ती व्यवस्थित बंद करून तिला कुलूप लावले. तिघांनी मिळून ती पेटी अंगणात नेली. दोराच्या साहाय्याने ती हळूच बाहेरच्या मोठ्या विहिरीत सोडून दिली आणि घरात येऊन झोपले.

तेनालीरामाच्या बोलण्याकडे आणि त्याच्या हालचालींकडे चोरांचे लक्ष होते. तेनालीरामाने दागिन्यांची पेटी विहिरीत सोडली असेच चोरांना वाटले. त्यांचा म्होरक्या म्हणालादेखील, ''चला ! हे एक बरं झालं. आता घर फोडायचा त्रास घ्यायला नको. विहिरीतल्या पेटीतून दागिने काढून घेऊ म्हणजे झालं.''

थोडा वेळ जाऊ देऊन ते चोर हळूच बाहेर आले. ते त्या विहिरीकडे गेले. दोघेजण विहिरीत उतरले. पेटी पार पाण्यात बुडाली होती. एवढेच नव्हे तर पेटीवर तीन-चार हात पाणी होते.

पाणी उपसून पेटी मोकळी करायची व ती फोडून आतील सामान पळवायचे असे त्यांनी ठरवले आणि पाणी उपसायला सुरुवात केली.

तेनालीराम जागाच होता. चोर विहिरीकडे जाताच तो हळूच बाहेर पडला. चोर आपल्याला दिसतील; पण आपण चोरांना दिसणार नाही, अशा रीतीने तो आडोशाला उभा राहिला.

चोरांनी विहिरीचे पाणी उपसायला सुरुवात करताच तेनालीराम बागेत गेला. हाती फावडे घेऊन वाफ्यावाफ्याने बागेला पाणी देऊ लागला. अगदी शांतपणे, आवाज न करता त्याचे काम चालले होते.

इकडे चोर पाणी उपसतच होते; पण विहिरीचे पाणी काही हटेना. पेटी काही दिसेना. तेनालीरामाचे बागेला पाणी देण्याचे काम चालूच होते.



संपूर्ण बागेला पाणी देऊन झाले. दिवस उजाडायची वेळ झाली. तेनालीराम हळूच आपल्या घराजवळ गेला आणि घराच्या दारातून चोरांना मोठ्याने म्हणाला, "गड्यांनो, बागेला भरपूर पाणी देऊन झालं आहे, तेव्हा तुम्ही आता आपलं काम थांबवा आणि जा. मी तुम्हांला आनंदानं सुटी देत आहे."

तेनालीरामाचे बोलणे ऐकून चोर अगदी घाबरून गेले. त्यांनी तिथून पोबारा केला. 'लाभ नाही तर नाही, पण निदान पकडलो गेलो नाही हे काय थोडं झालं' असे म्हणून त्यांनी आपले समाधान करून घेतले.

लेखक - म. स. घोलप

**चाणाक्ष** - चतुर, बुद्धिवान  **पोबारा करणे** - पळून जाणे

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे लिहा.** (५.३.१, ५.३.२)
  (१) घरात शिरलेली माणसे चोर आहेत, हे तेनालीरामाने कसे ओळखले ?
  (२) तेनालीराम पत्नीला आणि मुलाला मोठ्याने काय म्हणाला ?
  (३) 'आता घर फोडायचा त्रास घ्यायला नको' असे चोरांचा म्होरक्या का म्हणाला ?
  (४) चोर विहिरीचे पाणी का उपसू लागले ?
  (५) चोर पाणी उपसत असताना तेनालीराम काय करत होता ?
  (६) उजाडल्यानंतर तेनालीराम चोरांना काय म्हणाला ?

- **खालील शब्दसमूहांचा अर्थ समजून घ्या आणि वाक्यांत उपयोग करा.** (६.३.१)
  (१) सुळसुळाट होणे (२) धाड पडणे (३) पोबारा करणे.

- **खालील शब्द वाचा. चुकीचे शब्द दुरुस्त करून लिहा.** (४.३.१)
  गुपचुप, विट, आणी, कुलूप, विहीर.

  ..............................................................................

- **खालील शब्द काळजीपूर्वक वाचा. लिहा.** (४.३.१, ९.३.१)
  चाणाक्ष, सुरक्षित, म्होरक्या, आडोसा.

# २२. मी आहे दूरदर्शन




नमस्कार बालमित्रांनो,

मी आहे दूरदर्शन. अनेकजण मला टी.व्ही. (टेलिव्हिजन) किंवा दूरचित्रवाणी असंही म्हणतात. माझा शोध १९२६ मध्ये जॉन लॉगी बेअर्ड या शास्त्रज्ञानं लावला. माझा शोध म्हणजे विज्ञानाचा एक चमत्कारच आहे. बाहेरून मी खोक्यासारखा दिसतो; पण हजारो किमी दूरवर घडणारी घटना माझ्या काचेवर तुम्हांला घरबसल्या पाहता येते. तिथले आवाजही ऐकायला येतात. आहे की नाही चमत्कार !

मी भारतात प्रथम आलो, त्या वेळी माझ्यावरची चित्रं फक्त 'कृष्ण-धवल' असायची. ठरावीक शहरातल्या केंद्रावरून सादर केलेले कार्यक्रम लोक पाहू शकत होते. आता माझ्यात खूपच बदल झाले आहेत. आता रंगीत चित्रं दिसतात.

१.३.१, ३.३.३, ४.३.१, ४.३.३, ५.३.१, ५.३.२, ९.३.१

१९८८ सालापर्यंत एकाच वाहिनीचे कार्यक्रम भारतात दाखवले जात होते; नंतर मात्र अनेक वाहिन्या (चॅनेल्स) सुरू करण्यात आल्या. महाराष्ट्रात मी १९७२ साली आलो.

लहानांपासून थोरांपर्यंत मी सगळ्यांना आवडतो. अपंग व्यक्तींना तर माझा खूप उपयोग होतो ! मी त्यांना खरा सोबती वाटतो. घराघरांत मी त्यांच्या कुटुंबातलाच एक वाटतो. अजूनतरी विजेशिवाय मी चालू शकत नाही, म्हणून एखाद्या भागातील वीज काही कारणानं गेली, तर वीज केव्हा येईल आणि आपला टी.व्ही. केव्हा सुरू होईल, म्हणून लोक मोठ्या आतुरतेने विजेची वाट पाहत असतात.

ज्ञान देणे, मनोरंजन करणे ही माझी महत्त्वाची कामे. स्त्री-पुरुष, मुले-मुली या सगळ्यांसाठी माझे कार्यक्रम असतात. चांगलं पीक कसं काढावं, याबाबतचा योग्य तो सल्ला मी शेतकऱ्यांना देतो. एखाद्या शेतकऱ्यानं आपल्या कल्पकतेनं शेतीत विशेष प्रगती केली असेल, तर त्याचं दर्शन इतरांना घडवतो. शेतकऱ्यांच्या शंकांचं निरसन करतो; म्हणून तर शेतकरी मला आपला मित्र मानतात.

जगात, देशात घडणाऱ्या घटनांची माहिती बातम्यांतून मी सगळ्यांना देतो. त्या बातम्यांची चित्रंही दाखवतो; जणूकाही त्या प्रत्यक्ष घटनाच तुम्हांला पाहता येतात. वादळ, पाऊस यांबाबत योग्य तो अंदाज सांगतो.

आपल्या देशात अनेक छान छान निसर्गरम्य ठिकाणं आहेत. त्यांतील काही ठिकाणं मी तुम्हांला दाखवतो. त्यांची माहिती सांगतो. मोठे धबधबे, उंच उंच पर्वतशिखरं, वेगवेगळ्या देशांतले वेगवेगळे लहान-मोठे प्राणी, पक्षी, कीटक, वनस्पती यांचं निरीक्षण तुम्ही घरबसल्या करू शकता. यामुळं तुम्हांला कितीतरी प्रकारची नवीन

माहिती मिळते. तुमच्या ज्ञानात भर पडते. तुम्हांला घरी बसून हे सगळं पाहता येतं.

मुलांसाठी बालचित्रवाणीमार्फत शालेय आणि मनोरंजनाचे कार्यक्रम दाखवले जातात. मुलांनी बसवलेले मनोरंजनाचे कार्यक्रम तुम्हांला पाहायला मिळतात. यात संवाद, नाटुकले, नाट्यछटा, गोष्टी, नकला असे वेगवेगळे प्रकार असतात. कविता, गाणी तुम्हांला आवडतात. ती ऐकायला मिळतात. नेते, अभिनेते, गायक, शास्त्रज्ञ अशा वेगवेगळ्या लोकांना मी थेट तुमच्या घरातच घेऊन येतो; मग त्यांना प्रत्यक्ष पाहिल्यासारखा आनंद तुम्हांला मिळतो.

म्हणजे मी तुमच्या खूप उपयोगी पडतो; पण तुमच्या आरोग्यासाठी काही प्रेमळ सूचना मी तुम्हांला देणार आहे. त्या सूचना लक्षात ठेवा हं !

माझ्यासमोर बराच वेळ बसून तुम्ही कार्यक्रम पाहता. तसं जास्त वेळ बसलात, तर सगळ्यांत जास्त त्रास तुमच्या डोळ्यांना होईल. एकसारखं बराच वेळ पाहत राहिल्यानं डोळ्यांवर ताण पडतो. डोकं आणि मान यांनाही त्रास होतो. एवढंच नव्हे, तर सगळ्या शरीरालाच त्रास होतो. स्वभाव चिडचिडा होतो; म्हणून दिवसभरात एक तासापेक्षा जास्त वेळ माझ्यासमोर न बसण्याचा संयम पाळा.

माझ्यापासून कमीत कमी दहा फूट अंतरावर बसून कार्यक्रम पाहत जा. लहान आवाजात कार्यक्रम ऐकण्याची सवय लावून घ्या. नाहीतर तुमच्या कानांवर वाईट परिणाम होईल. मोठ्या आवाजाचा त्रास आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांनाही होतो, हे विसरू नका.

अशी काही पथ्यं सांभाळली आणि माझा योग्य उपयोग करून घेतला, तर मला खूप आनंद होईल. एवढे बोलून मी माझे भाषण संपवतो.

नमस्कार !

लेखक - वि. द. इनामदार

**जॉन लॉगी बेअर्ड** - ब्रिटनमधील संशोधक
**कृष्ण-धवल** - काळ्या-पांढऱ्या रंगात
**मनोरंजन** - मनाची करमणूक
**शंका निरसन करणे** - शंका दूर करणे, शंकेचे समाधान करणे
**निसर्गरम्य** - मनोहर, सुंदर **अभिनेता** - चित्रपट व रंगभूमीवरील कलाकार

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे लिहा.** (५.३.१, ५.३.२)
  (१) 'दूरदर्शन म्हणजे विज्ञानातील एक चमत्कार' असे का म्हटले आहे ?
  (२) दूरदर्शनची महत्त्वाची कामे कोणती ?
  (३) दूरदर्शनवरील बातम्यांतून आपणांस कोणकोणती माहिती मिळते ?
  (४) दूरदर्शनमुळे घरबसल्या तुम्ही कोणकोणत्या गोष्टी पाहू शकता ?
  (५) शेतकऱ्यांना दूरदर्शनचा कसा उपयोग होतो ?
  (६) दूरदर्शनवरील कार्यक्रम पाहताना तुम्ही कोणती काळजी घ्याल ?
- **रिकाम्या जागा भरा.** (५.३.२)
  (१) दूरदर्शनचा शोध .................... या शास्त्रज्ञाने लावला.
  (२) दूरदर्शनवरील कार्यक्रम महाराष्ट्रात प्रथम .......... साली सुरू झाले.
  (३) अजूनतरी दूरदर्शन .......... शिवाय चालू शकत नाही.
- **दूरदर्शनवरील तुम्हांला आवडलेल्या एका कार्यक्रमाविषयी पाच ते सहा वाक्ये लिहा.** (४.३.३)
- **'अति तिथे माती' ही म्हण दूरदर्शनवरील कार्यक्रम पाहण्याबाबत कशी लागू पडते; ते पाच ते सहा ओळींत लिहा.** (४.३.३)
- **खालील शब्द काळजीपूर्वक वाचा. लिहा.** (४.३.१, ९.३.१)
  दूरदर्शन, जॉन लॉगी बेअर्ड, वाहिनी, बालचित्रवाणी.



# नमुना चाचणी प्रश्न

इयत्ता पहिली आणि दुसरीच्या पाठ्यपुस्तकात चार टप्प्यांवर नमुना चाचण्या दिल्या होत्या. इयत्ता तिसरीच्या पाठ्यपुस्तकात शेवटी सबंध पाठ्यपुस्तकातील आशयावर आधारित नमुना प्रश्न दिले आहेत. वार्षिक नियोजनानुसार मूल्यमापनासाठी घेण्यात येणाऱ्या चाचण्या आणि वार्षिक परीक्षेसाठी या नमुना प्रश्नांची मदत शिक्षकांनी घ्यावी. याच धर्तीवर अन्य व जादा प्रश्न तयार करावेत.

- **खालील प्रश्नांची उत्तरे लिहा.** (४.३.३, ५.३.१, ५.३.२)

(१) गांधीजींनी श्लोक पाठ करण्याचा निश्चय पूर्ण करण्यासाठी काय केले ?
(२) कवीने गाणे गाणाऱ्यांना काय म्हटले आहे ?
(३) सुभेदाराच्या डोक्यावरील पाण्याचा हंडा खाली का पडला ?
(४) लाडू मिळवण्यासाठी बिम्मने कोणती युक्ती केली ?
(५) डोंगरदादाचा एकटेपणा केव्हा संपला ?
(६) मुलांनी कंधारच्या सहलीत काय काय पाहिले ?
(७) सूर्योदयाच्या वेळी तुम्ही पाहिलेल्या दृश्याचे वर्णन तुमच्या शब्दांत लिहा.
(८) ज्योतीच्या वेगवेगळ्या रूपांची नावे लिहा.
(९) दूरदर्शनचे कोणकोणते फायदे आहेत ?
(१०) तेनालीरामाला घाबरून पळालेल्या चोरांनी कशावर समाधान मानले ?

- **कोण, कोणाला म्हणाले ते लिहा.** (५.३.१)

(१) ''पाहिलं तुमचं रान आणि हरपलं माझं भान.''
(२) ''शाबास माझ्या पुता !''
(३) ''शिल्प म्हणजे दगडातून बनवलेल्या कोरीव मूर्ती.''
(४) ''आधी आम्हांला मारा. मुलींवर काय गोळ्या झाडता ? ही माझी छाती उघडी आहे.''
(५) ''आत्ताच मी फरशी पुसून ठेवली होती. काय ही गिजबिज करून ठेवली आहेस तू या फरशीवर ?''

- **शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.** (६.३.१)

कौतुक करणे, घामाघूम होणे, बाद होणे, नजरेत भरणे, भान हरपणे.

- **समानार्थी शब्दांच्या जोड्या जुळवा.** (६.३.१)

  अध्ययन, निपचित, बरवे, प्रशस्त, प्रातःकाळ

  ऐसपैस, सकाळची वेळ, न हालता, शिकणे, चांगले

- **विरुद्धार्थी शब्द लिहा.** (६.३.१)

  प्रकाश, आवडती, सुख, बंद, जुना, खूश, लांब.

- **अक्षरे जुळवून शब्द बनवा.** (९.३.१)

  १. र चि का त्र ४. प प क्षी शु ७. ब ब तो ता ड

  २. री त क शे ५. धा मा न स ८. ग गा ट झ झ

  ३. दा र थी सा ६. द दू र्श र न

- **काय ते लिहा.** (५.३.२)

  (१) टपटप अंगावर पडतात ............

  (२) पावसाळ्यात खळाळा वाहतात ............

  (३) स्तब्ध उभे राहून म्हणतात ते देशाचे गीत ............

- **अर्थ लिहा.** (६.३.१)

  नवल, सुसज्ज, अनावर, चाणाक्ष, म्होरक्या, नाद, स्तब्ध, देह.

- **जोड शब्द तयार करा.** (६.३.१)

  जसे – रान - रानोरानी

  पान, घर, वेळ, गाव, दार, देश.

- **खालील शब्द वाचा. चुकीचे शब्द दुरुस्त करा. वळणदार अक्षरांत लिहा.** (४.३.१)

  वीहीर ........................ शिकारि ........................

  पुश्कळ ........................ थट्टा ........................

  ऊंदीर ........................ चीत्र ........................

  शिस्त ........................ सूंदर ........................

  तिर्थक्षेत्र ........................ झुळूक ........................

- **ऐका व लिहा.** (४.३.२)

स्वातंत्र्य .................. हस्तलिखित .................. स्तब्ध .................. स्वराज्य ..................

निर्झर .................. अभिनंदन .................. बेशुद्ध .................. प्रतिस्पर्धी ..................

- **खालील शब्दांना मराठी भाषेतील शब्द सांगा.** (९.३.१)
कोर्ट, कॉलेज, रोड, हॉस्पिटल, टी.व्ही., बॉल, कॅप्टन.

- **तुमच्या शाळेत स्वातंत्र्यदिन कसा साजरा केला, ते खालील मुद्द्यांवर आधारित लिहा.** (४.३.३)
परिसरस्वच्छता, सजावट, ध्वजवंदन, पाहुण्यांचे भाषण, कवायत, प्रभातफेरी, शाळेतील खाऊवाटप.

- **पाठ्यपुस्तकातील तुम्हांला पाठ असलेली कोणतीही एक कविता म्हणून दाखवा.** (२.३.२)

- **रिकाम्या जागी योग्य ते शब्द लिहा.** (५.३.२)
(यश, गोफणगुंडा, नेम, सावधान, राजधानीत)
(१) .................. अशी सूचना मिळाल्यावर राष्ट्रगीत सुरू झाले.
(२) अधिकाऱ्याने चिडून गोळी घातली; पण .................. चुकला.
(३) पिकाची राखण करताना चणिया सफाईने .................. चालवतो.
(४) भाग्यश्रीने मोठ्या जिद्दीने हे सारे .................. मिळवले.
(५) सध्या .................. चोरांचा फार सुळसुळाट झालेला आहे.

- **एका वाक्यात उत्तरे द्या.** (५.३.१, ५.३.२)
(१) चणिया शेतामध्ये कोणते धान्य पिकवतो ?
(२) आरोग्य चांगले राहण्यासाठी केव्हा उठावे ?
(३) तेनालीरामाने कोणती पेटी विहिरीत सोडली ?

(४) भाग्यश्रीची कोणती इच्छा आहे ?

(५) मुलगा कोणावर स्वारी करणार आहे ?

(६) दूरदर्शनचा शोध कोणी लावला ?

(७) जितू बेचैन का झाला ?

- **खालील परिच्छेद वाचून दाखवा.** (३.३.२)

माझे पहिले दैवत विद्या. विद्येशिवाय मानवाला कुणी विचारत नाही. विद्या ही सर्वांना अवगत झाली पाहिजे. माणसाला जगायचे असेल, तर जशी अन्नाची आवश्यकता आहे, तशीच विद्येचीही आहे. त्यासाठी सर्वांनी शिक्षण घेतले पाहिजे.

- **खालील चित्राचे निरीक्षण करा. त्याचे पाच ते सहा वाक्यांत वर्णन करा.** (२.३.३)



- **खालील चित्राचे निरीक्षण करा. चित्रावर आधारित प्रश्न तयार करा.** (२.३.४)






उजव्या बाजूकडील
उलट-सुलट वळण






बाणाच्या दिशेला
वाहने उभी करावीत.






दोन्ही दिशेला
वाहने उभी करावीत.






स्कूटर व
मोटारसायकल स्टॅन्ड






सायकल स्टॅन्ड






टॅक्सी स्टॅन्ड






ऑटोरिक्षा स्टॅन्ड



प्रथमोपचार केंद्र

वरील चिन्हांचे वाचन करून घ्यावे. त्यांचे अर्थ समजावून सांगावेत. रहदारीच्या नियमांची माहिती द्यावी. (३.३.१)

